# लोकवाङ्मय गृह

## नवी प्रकाशने

- एका स्पृश्याची डायरी (कादंबरी) : डॉ. सदा कऱ्हाडे (दुसरी आवृत्ती)
- डॉग व्हॅन (कथासंग्रह) : राजा राजवाडे
- पाब्लो नेरुदाच्या आठवणी : अनु. : सुधाकर बोरकर
- तिरकस आणि चौकस (ललीत लेख) : दिलीप पुरुषोत्तम चित्रे
- प्रश्नशोध (समीक्षा) : प्रा. केशव मेश्राम
- तीन अर्वाचीन कवी : मार्क्सवादी दृष्टिक्षेप : स. त्र्यं. कुल्ली
- साहित्यमुद्रा (समीक्षा) : उषा मा. देशमुख
- गुरुदत्त (चित्रपट दिग्दर्शकाची कहाणी) : भाऊ पाध्ये
- रशियाहून लिहीलेली पत्रे : रविंद्रनाथ टागोर
- मराठीतून रशियन शिकूया (आवृत्ती दुसरी) नीना पतपोवा–मधुकर सामंत
- ज्योतिषशास्त्रावर प्रकाशझोत : जगदीश काबरे
- अण्णा भाऊ साठे (बालजीवनमाला) : बाबुराव गुरव
- महात्मा जोतिबा फुले (बालजीवनमाला) : वीणा कऱ्हाडे




लोकवाङ्मय गृह
भुपेश गुप्ता भवन,
८५, सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई–४०० ०२५.
फोन : ४२२६४६८


जगदीश काबरे

# ज्योतिषशास्त्रावर प्रकाशझोत




लोकवाङ्मय गृह आणि लोकविज्ञान संघटना यांच्यावतीने श्री. जगदीश काबरे लिखित 'ज्योतिष शास्त्रावर प्रकाशझोत' या पुस्तकाचे प्रकाशन शनिवारी दादरच्या छबिलदास शाळेत डॉ. श्रीराम लागू यांच्या हस्ते झाले त्यावेळी घेतलेल्या छायाचित्रात डावीकडून श्री. हेमू अधिकारी, कविवर्य नारायण सुर्वे, डॉ. श्रीराम लागू आणि पुस्तकाचे लेखक श्री. जगदीश काबरे दिसत आहेत. (छाया : घनःश्याम भडेकर).

# ज्योतिषशास्त्रावर प्रकाशझोत

## जगदीश काबरे




---

लोकवाङ्मय गृह

ज्योतिषशास्त्रावर प्रकाशझोत/जगदीश काबरे

म/३८०
पहिली आवृत्ती / ऑगस्ट १९९०

[redacted]

मुखपृष्ठ : कमल शेडगे

प्रकाशक :
सुकुमार दामले
लोकवाङ्मय गृह,
८५ सयानी रोड,
भुपेश गुप्ता भवन,
प्रभादेवी,
मुंबई - ४०० ०२५

मुद्रक :
प्रकाश विश्वासराव
न्यू एज प्रिं. प्रेस,
८५ सयानी रोड,
भुपेश गुप्ता भवन,
प्रभादेवी,
मुंबई - ४०० ०२५

किंमत - रु. १५/-

## अनुक्रमणिका

जे आत्मविश्वासाने आपले आणि
पर्यायाने मानवी समाजाचे भवितव्य
घडवू इच्छितात त्या सर्वांना

# वैज्ञानिक दृष्टिकोनच का?

मित्रांनो,

चळवळीत काम करताना नवीन येणाऱ्या कार्यकर्त्यांसाठी चळवळीच्या अंगोपांगांची माहिती व्हावी, उद्दिष्टे समजावीत या दृष्टीने जुन्या कार्यकर्त्यांनी त्यांच्या जाणिवा विस्तारण्याचं काम प्रत्यक्ष कार्य करता करता केलं पाहिजे. त्यासाठी अभ्यासवर्ग, चर्चा, संवाद अशा उपक्रमांचा सहभाग जाणीवपूर्वक वाढवला पाहिजे. पण त्याचबरोबर चळवळीशी संबंधित विविध अध्वर्यूंचे लिखित विचारही त्यांच्यापर्यंत पोहोचवले पाहिजेत. वैचारिक बैठक पक्की होण्यासाठी वाचनाची आत्यंतिक गरज लक्षात आणून दिली पाहिजे.

वाचनामुळं नवीन विचार जसे कळतात तसेच आपल्या विचारांनाही दिशा मिळते. आपल्या ओंजळीत असलेल्या विचारफुलांपैकी कोमेजलेली, सुकलेली, निर्माल्य झालेली विचारफुलं टाकून नवीन कळ्या आणि काळाच्या उदरात फुलणारी नवीन विचारफुलं वाचनामुळं भरभरून घेता येतात. काळाबरोबर पावलं टाकण्यासाठी आवश्यक तेवढाच भूतकाळ विचारात घेण्याची कुवत येते. आणि भूतकाळातील चुकीच्या रूढी, परंपरा, कर्मकांड आणि धार्मिक समजुती यांना बिनदिक्कतपणे फाटा देण्याचे बळ अंगी येते.

म्हणूनच कोणत्याही चळवळीत कार्य करू इच्छिणाऱ्यांनी भारताचाच नव्हे तर जगाचा इतिहास त्या दृष्टिकोनातून समजून घेतला पाहिजे. त्यापासून बोध घेऊन त्याची आपल्या मातीशी आणि वर्तमानाशी सांगड घातली पाहिजे. तरच चळवळीत सहजपणे सामावून जाता येईल. अन्यथा केवळ हौस म्हणून सहभागी होऊ इच्छिणारे थोड्याच काळात चळवळीतून आपोआपच बाहेर फेकले जातात.

प्रत्येक तरुणाला काहीतरी करण्याची ऊर्मी असते. पण नेमकं काय करायचं याचं मार्गदर्शन सहसा कुणीही -- अगदी आईवडीलही देऊ शकत नाहीत. अशा वेळेस तरुणांना मिळते ती फक्त रूढी, परंपरा, धार्मिक कर्मकांड यांची वाट. मग ते समाजातील अन्य घटकांप्रमाणे गतानुगतिकतेने तिच एक सामाजिक बांधिलकी समजू लागतात. लवकरच त्यांना कळून चुकते की, या प्रकारच्या वागण्यातच एक प्रकारची सामाजिक सुरक्षितता आहे. मग सहजी मिळालेल्या सुरक्षिततेला नवीन विचारांचे सुरुंग लावण्यास तो धजावत नाही. समाज काय म्हणेल? ह्या प्रश्नाचा बागुलबुवा त्याची आयुष्यभर पाठ सोडत नाही. परिणामी आतापर्यंत चालत आलेले रितिरिवाज धुडकावण्याचं आणि काळानुरूप वागण्याचं..... विचार करण्याचं धाडसच गमावून बसतो. अशा प्रकारे निराशाजनक मानसिकतेत तो भरडला जात असला तरी हीच सामाजिक सुरक्षितता त्याची त्याविरुद्ध बंड करण्याची ताकद खच्ची करते.

या सर्वांचा परिपाक म्हणून तो धर्मभोळा, अंधश्रद्ध, कर्मकांडप्रिय, रूढिग्रस्त होतो. आपल्या वाडवडीलांपासून ह्या गोष्टी चालत आल्या आहेत ना मग त्या करत रहायच्या. त्यामागची कारणं शोधून डोक्याला शिणवटा नाही आणायचा. ज्या अर्थी पूर्वजांनी ही धार्मिक कृत्ये सुरू केली त्या अर्थी ती विचारपूर्वकच असली पाहिजेत. आणि म्हणूनच ती एवढी प्रदीर्घ काळ टिकली आहेत. आपण कोण हे सर्व बदलणारे! आपण तर त्या अज्ञाताच्या हातचे बाहुले. ती अज्ञात नियतीच आपल्याला खेळवतेय. अशा प्रकारच्या विचारांना संस्कार मानून सुखाने झोपी जातो.

ही झोपच आपल्या समाजाला, २१ व्या शतकाच्या उंबरठ्यावर असतानाही, अवकाशाला गवसणी घालण्याच्या विजिगीषू प्रवृत्तीवर मात करून ३/४ हजार वर्षांपूर्वीच्याच वाटेनं जायला भाग पाडतेय. त्यामुळे मानवाची उत्क्रांती होण्यात मोठाच अडथळा निर्माण होतोय. हे आता आपण लक्षात घ्यायला हवंय.

अज्ञाताविषयी पूर्वीपेक्षा आज आपल्याला जास्त माहिती झालंय ते वैज्ञानिक दृष्टिकोनामुळंच मनाला पडणाऱ्या का? का?? आणि का??? या प्रश्नांची उकल करण्याच्या धडपडीमुळंच, निसर्गाची भाषा समजून घेण्याच्या जिज्ञासू वृत्तीमुळंच. ह्या पुढंही भविष्यात हीच वृत्ती मानवाची उद्धारकर्ती ठरणार आहे. तरीही आपण ३/४ हजार वर्षांपूर्वीच्या ग्रहताऱ्यांविषयीच्या, अज्ञातातील अंधःकाराच्या आणि सोय म्हणून निर्माण झालेल्या अंधश्रद्धांच्या कल्पनांना कवटाळून बसणार आहोत काय?

पूर्वजांनी निश्चितच अभ्यास केला होता. पण त्यांच्या अभ्यासाला काळाच्या मर्यादा होत्या. तशा त्या आजही आहेत. पण त्यांचा आवाका वाढलाय. त्या विकसित झाल्यायत. भविष्यात आणखीनच विकसित होत रहाणार आहेत. या अर्थानं जीवन हे बदलत असतं. प्रश्न...... त्यांची उत्तरे..... पुन्हा प्रश्न.... अशा चढत्या भाजणीनंच विकासाचा मार्ग खुला होत जात असतो. मात्र येणाऱ्या प्रश्नांना धाडसानं सामोरं जायचं की, पुरातनकालीन अविकसित विचारांचा आधार घेऊन त्याच त्या प्रगतीला खीळ घालणाऱ्या, मेंदूला बथ्थड बनवणाऱ्या कल्पनांना कवटाळून बसायचं?

समाजात शोषणकर्ता आणि शोषित असे दोन वर्ग सुरवातीपासून म्हणजे माणूस जेव्हापासून समूह करून राहू लागला, टोळ्यांचं जीवन जगू लागला, थोडक्यात, आदिमानवाच्या अवस्थेतून बाहेर पडून शेतकी अवस्थेत आला तेव्हापासूनच हे दोन वर्ग तयार झालेयत. पैकी शोषणकर्ता वर्ग नेहमीच स्वतःची सत्ता अबाधित राखण्यासाठी साम, दाम, दंड, भेद या नीतीचा सतत वापर करत

आला आहे. शोषित वर्गाला ज्ञानापासून आणि विचारांपासून नेहमीच वंचित ठेवत आला आहे. परिणामी शोषित वर्गाची संख्या मोठी असली तरी मूठभर शोषणकर्त्यांनी त्याच्यावर सत्ता गाजवल्याची सदोदीतच साक्ष देत आलाय.

काळ बदलत गेला. तशा राजेशाही, सरंजामशाही, भांडवलशाही अशा समाजातील अवस्थाही बदलत गेल्या. पण शोषणकर्ता आणि शोषित हे दोन वर्ग मात्र कायमच राहिले. नंतर लोकशाहीचा उदय झाला. स्वातंत्र्य, समता आणि बंधुता या त्रिसूत्रीचा विजयघोष निनादू लागला. आणि ह्या सगळ्या शाह्यांच्या इमारती धडाधड कोसळू लागल्या. शोषित वर्गातील लोकांची पिचण्याची मर्यादा संपली. मग ते उसळून उठले. शोषणकर्त्यांना गाडून टाकू लागले; गिलोटीन. खालीत्यांच्या माना उडवल्या. शोषणकर्ता आणि शोषित वर्ग नामशेष झाले. 'हम सब एक है'चा पुकारा करत नव्या पहाटेचा सूर्योदय झाला. पण..... पण क्षणकालच. हजारो वर्षांत जखडलेली मनं हळूहळू परंपरांच्या साच्यात पुन्हा घट्ट बसू लागली. लोकशाहीतही नवीन पद्धतीनं पुन्हा शोषणकर्ता आणि शोषित वर्ग डोकं वर काढू लागला.

असं का घडलं? कारण पुन्हा प्रत्येक समाजाची अस्मिता डोकं वर काढू लागली. सत्तास्थानं आपल्याकडंच रहावीत म्हणून हितसंबंधाचा वापर सुरू झाला. हे होण्यासाठी सोपी मळलेली वाट होती धार्मिक पुनरुज्जीवनवादाची. शोषणकर्त्या वर्गानं पुन्हा तिचे बोट धरले. पण एका बाजूने विज्ञानाचे शोध वेगानं एकापाठोपाठ लागत गेल्यानं नवीन दृष्टी आणि औद्योगिक क्रांतीच्या परिणामामुळं शोषणकर्त्या वर्गाला धर्माचं बोट पूर्वीएवढं घट्ट पकडता आलं नाही. त्यामुळं झालं काय की, एका बाजूनं धर्मांचा पगडा आणि दुसऱ्या बाजूनं त्यातील फोलपणा लक्षात यायला लागला. ह्या परिस्थितीत समाज गोंधळलेल्या अवस्थेत न जाता तरच नवल.

ही गोंधळाची अवस्था घालवावी आणि वैज्ञानिक दृष्टी यावी म्हणून ह्या काळात जगभर प्रयत्न सुरू झाले. भारतात लोकहितवादी, आगरकर, महात्मा फुले, आंबेडकर आदींनी एकूणच नवी दिशा देण्याचा प्रयत्न केला. आणि बव्हंशी तो यशस्वीही ठरला. पण तरीही माणूस समाजव्यवस्थेच्या लढ्यात पूर्णपणे यश मिळवू शकला नाही. कारण पुन्हा सत्ताकारण. सामान्य जनांना अज्ञानात, गुलामगिरीत, दैववादाच्या भोवऱ्यात गरगरवून आपले पाश बळकट करण्यात शास्ता वर्ग सतत धडपड करीत आला आहे.

आज विज्ञानाच्या प्रगतीमुळं परिस्थितीचा एवढा जबरदस्त रेटा पडतोय की, जुन्या रूढी, परंपरा आणि अंधश्रद्धा कोलमडून पडाव्यात. बऱ्याच ठिकाणी भगदाडेही पडलेली आहेत. पण हा बदल रेट्यामुळं होतोय म्हणून वरवरचा आहे. अनिच्छेनं झालाय. आगगाडीत शिवाशीव पाळता येत नाही म्हणून चातुर्वण्य नाहीसे झाले. प्रवासात सोवळं वापरता येत नाही म्हणून ने टाकलं. मात्र ह्या संकल्पना



अजूनही भल्याभल्यांच्या मनातून घर करून आहेत. म्हणूनच कुणाचं नाव विचारलं की त्याच्या आडनावावरून त्याची जात कोणती हा प्रश्न प्रथम मनात येतो. ह्याच प्रकारे ग्रहताऱ्यांच्या परिणामाबद्दल म्हणता येईल. ग्रह, उपग्रह, तारे म्हणजे काय, हे जरी पूर्णपणे कळलं असलं तरी त्याचा मानवी जीवनावर परिणाम होतो असं मनात कुठंतरी वाटत रहातं. म्हणूनच चंद्रावर पाऊल ठेवून तो काय आहे, कोणत्या नियमांनी बद्ध आहे हे जरी कळलं आणि दूरदर्शनवरून प्रत्यक्ष पाहिलं तरी संकष्टी चतुर्थी करतोच ना?

तेव्हा मित्रांनो, आपल्याला लढायचंय ते अशा खोलवर रुजलेल्या पगड्यांविरुद्ध. हा लढा पिढ्यान्‌पिढ्या चालू रहाणारा आहे. आपण हार खायची नाहीय. किनाऱ्यावर आपटणाऱ्या लाटांसारखी जरी आज आपली परिस्थिती असली तरी एकेक लाट मिळून एकामागोमाग किनाऱ्याला एकजुटीने धडका दिल्यावर त्या किनाराही गिळंकृत करतात. तसंच आपल्या सर्वांना विकृत धर्मकल्पनांना, रूढी परंपरांना, अंधश्रद्धांना एकजुटीनं धडका देऊन नवीन समाज की जो समानतेच्या पायावर, वैज्ञानिक दृष्टिकोनाच्या आधारावर उभारायचाय. सुरवातीला आपलं खच्चीकरण केलं जाईल हितसंबंधियांकडून, प्रचंड टीकाही होईल, त्यात काहींचा कपाळमोक्षही होईल. पण आपण निष्ठेनं झुंज घ्यायचीय. पिढ्यान्‌पिढ्यांच्या मापानं आपल्या चळवळीचे परिणाम मोजायचे आहेत. कारण लक्षात ठेवा, विरोधातूनच विकास होतो. म्हणूनच विरोधक हे आपले शत्रू नसून आपल्या विकासाला सहाय्य करणारे मित्रच आहेत.

'ज्योतिषशास्त्रावर प्रकाशझोत' टाकायचाय तो एवढ्याचसाठी की, गतानुगतिक झालेल्या मनाला, झोपी गेलेल्या मेंदूला जाग आणायचीय. काळाची पावले ओळखून आपल्या पावलांची वाटचाल करायला हवीय. आणि भविष्यात एकसंध असा प्रगल्भ समाज निर्माण करायचाय.

एवढं लिहून मी आपली रजा घेतो आणि तुम्हास प्रकाशझोताची वाट मोकळी करून देतो.

- जगदीश काबरे

# पुरस्कार

सहसा माझा ज्या गोष्टींवर विश्वास नाही त्या गोष्टींवर मी वितंडवाद घालत नाही. कारण बऱ्याच श्रद्धेच्या गोष्टी वादविवाद घालून पटवून सांगता येत नाहीत. चिकित्सा टाकून दिल्याशिवाय श्रद्धा निर्माण होत नाही. व एकदा श्रद्धा बसली की, मतपरिवर्तन होत नाही. देव आहे किंवा नाही याबाबत निश्चित काही सांगता येत नाही. पण देवाला जी भिन्न भिन्न नावे व आकार आहेत ते निश्चितच मानवनिर्मित आहेत. त्यामुळे मूर्तिपूजा मला मान्य नाही. त्याचप्रमाणे तांत्रिक विधी, मंत्रतंत्र या गोष्टी जर मानवानेच निर्माण केलेल्या असतील तर त्याच्यावरही आंधळा विश्वास टाकण्यात मला स्वारस्य नाही. मानवी जीवनातील पाप-पुण्याच्या कल्पना या दैवी कल्पनांशी कधीच जुळणार नाहीत. विधवा स्त्रीचे केशवपन करावे, पतीबरोबर सहगमन करावे, नवरा कसाही असला तरी परमेश्वर मानावा, या गोष्टी देवाज्ञेने निर्माण होणे शक्य नाही. चांगले व वाईट ठरण्याची आपली व्याख्या स्वतःला हितकारक व काळानुसार सोयिस्कर अशी असल्यामुळे मानवी आज्ञेपुढे मान झुकवणे मला मान्य नाही. अधिकाधिक लोकांना सुखकारक अशा चांगल्या जीवनाच्या निर्मितीसाठी कायदा अस्तित्वात येतो. जे आपण पवित्र, दैवी, ईश्वरसंमत असे परंपरेने म्हणत आलो, तेही वारंवार बदलण्याची आपली तयारी असायला हवी. तर्काने सत्य समजते पण सुख मिळतेच असे नाही. किंबहुना सत्याने दुःखच पदरात पडते. मग माणसे सत्याऐवजी श्रद्धेचा आश्रय धरतात. कुणावर तरी भरवसा ठेवतात. त्याला अंतर्ज्ञान किंवा साक्षात्कार होतो, असेही मानतात. व त्यामुळे त्यांची दुःखे पुष्कळच कमी होतात. मनोरुग्णाला जशी साइकॅट्रिकची गरज असते तसेच समाजातील बहुसंख्य लोकांना एका बुवाची, मांत्रिकाची, ज्योतिष्याची, गुरूची किंवा जपजाप्याची गरज लागते. हा सारा मूर्खपणा आहे. हे जेवढे आपण त्यांना पटवू जाऊ तेवढा त्यांचा त्या गोष्टीवरचा विश्वास वाढत जातो. आपल्याला भोगावे लागणारे दुःख हे आपल्या उणिवांचे वा दुर्गुणांचे अपत्य नाही तर दैवी अवकृपेमुळे हे आपल्याला भोगावे लागते, असे म्हटले म्हणजे दुःख जरी संपत नसले तरी दुःखाचे दुःख कमी होते. आपल्याला खरं तर जबाबदारी टाळण्याला किंवा प्रयत्न न करण्याला निमित्त हवे असते. एखाद्या खुंटीवर टोपी अडकवून ठेवावी इतक्या सहजतेने आपले दुःख दैवी अवकृपेच्या खुंटीवर आपण अडकवून ठेवतो.

### भविष्यकथनाचे किती प्रकार !

या श्रद्धांपैकी सर्वात सोपा श्रद्धाविषय म्हणजे भविष्यकथन. याचेही अनेक प्रकार आहेत. जन्मवेळेची पत्रिका, हातांवरील रेषा, चेहऱ्याची ठेवण या नित्य आढळणाऱ्या भविष्यकथनाच्या छटा. शिवाय संख्याशास्त्र, छायाशास्त्र या अनेक गोष्टी अशा आहेत की, ज्यामुळे भविष्यकथनाचे निरनिराळे प्रकार निर्माण झालेले आहेत. शिवाय कुणाला रुद्राक्ष, कुणाला उजव्या सोंडेचा गणपती, कुणाला विशिष्ट प्रकारचा खडा भाग्योदय देतो तर कुणाला गायत्री मंत्र किंवा अन्य मंत्र सुखी आयुष्य देतात. अशा तऱ्हेच्या अनेक समजुती आढळतात. खुद्द पं. नेहरूंच्या घरी त्यांच्या प्रकृतीला आराम पडावा म्हणून अनेक दिवस मृत्युंजयमंत्राची साधना करवली गेली. हे श्रद्धेचे लोण ही केवळ गरिबांचीच मिरासदारी आहे असे नाही, तर श्रीमंत, सत्ताधारी यांनाही श्रद्धेवर जगणे आवडते. ज्यांच्याजवळ नाही ते मिळवण्यासाठी, ज्यांच्याजवळ आहे ते टिकवण्यासाठी, किंवा जे सट्ट्यात, वा सौद्यात हरले आहेत त्यांना पूर्वस्थितीला येण्यासाठी कुठल्या तरी शक्तीला शरण जाण्याची इच्छा होते. आणि या शरणभावनेतूनच अनेक श्रद्धा जन्म पावतात. लोक खरोखरीच त्या सर्व गोष्टी सत्य मानू लागतात.

ज्योतिष हे त्यापैकीच एक. त्यातही विशेषतः राशिभविष्य हे अधिक लोकप्रिय आहे. प्रत्येक ग्रहाची भ्रमणअवस्था भिन्न भिन्न असल्याने त्यांच्या कोट्यावधी आकृत्या निर्माण होऊ शकतात. जन्मवेळची वेळ खरी आहे, असे गृहीत धरून त्या काळची ग्रह परिस्थिती पत्रिका व्यक्त करते. त्यातही सूक्ष्म ज्योतिषासाठी अंशात्मक पत्रिका निर्माण करतात.

सर्वच ग्रहगोलांचा मानवावर काही परिणाम होतो, हे आता शास्त्रज्ञांनी मान्य केले आहे. तेव्हा शनीचा, मंगलाचा वा अन्य ग्रहांचा पृथ्वीवर काही ना काही तरी परिणाम होत असणारच. समुद्राची भरती ही चंद्राच्या स्थितीवर अवलंबून असते हे आपण पाहतोच. तेव्हा ग्रहांचा काही ना काही तरी परिणाम वनस्पतींवर, मानवावर व एकूण चैतन्यसृष्टीवर होत असणारच. फक्त हा जो परिणाम आहे, त्याची मोजदाद करणारी यंत्रणा आज ढोबळ आहे. जगाच्या कुठल्या ना कुठल्या तरी भागात शेकडो मुले एकाच वेळी जन्मतात. कित्येकदा एकाच गावात, एकाच हॉस्पिटलमध्ये दोन मुलांचा जन्म अगदी एकाच क्षणी होऊ शकतो. अशा वेळेला त्यांच्या माता-पित्यांची पत्रिका लक्षात घ्यावी असे ज्योतिषी म्हणतात.

प्रत्यक्षात मात्र असे घडतच नाही. सर्वसामान्य ज्योतिषी या उद्योगात पडतच नाहीत. त्यांनी ढोबळ मानाने एक तर तारखेनुसार किंवा तिथीनुसार ग्रहांच्या जागा पक्क्या करून टाकलेल्या असतात. आणि त्या भ्रमणकाळात कोणत्या ग्रहाचा परिणाम त्या व्यक्तीवर विशेष होईल त्याचे निदान केलेले असते.

वर्तमानपत्रात प्रसिद्ध होणारे राशिभविष्य लिहिण्यास कोणतीच अक्कल लागत नाही. मीसुद्धा काही काळ ते लिहिले आहे. संपूर्ण वर्षाचे राशिभविष्य ग्रंथरूपाने बाजारात मिळते. तेव्हा या वार्षिक भविष्याच्या पुस्तकाच्या आधारे आम्ही साप्ताहिक भविष्याचा स्तंभ लिहितो. एकच पत्रिका चार ज्योतिष्यांना

दाखवली तर त्यांची अनुमाने निराळी असतात, व ग्रहांचे परिणाम दाखवणारी साधनेही निराळी असतात. एखाद्या गोष्टीला शास्त्र म्हणण्यासाठी काही निकष असतात. शास्त्र हे व्यक्तिगत नसते.

एका नियमाचा परिणाम कुणाच्याही करवी आणि कुणावरही केला तर त्याचे उत्तर एकच असायला हवे. भविष्यकथनात प्रत्येकाचे ठोकताळे वेगळे. त्यात एक गुप्तताही पाळली जाते. काही ग्रहस्थिती अर्थहानीकारक, वा संकटकारक अशी असते, असे म्हणतात. पण ती ग्रहस्थिती जवळपास समान असूनही काहींना वेगळे अनुभव येतात. ज्योतिष किंवा भविष्यकथनावर विश्वास असणाऱ्या प्रत्येकावर ज्योतिषाचा मानसिक प्रभाव जाणवल्यामुळे, त्याचे म्हणणे खरे आहे, या गोष्टीला ओढूनताणून तो मान्यता देतो.

उत्तम व्यक्तिमत्त्व, सूक्ष्म मानसशास्त्र, अलौकिक व्यवहारज्ञान यांच्या बळावर अंदाजाने पुष्कळ गोष्टी सांगता येतात. त्यात अंतर्ज्ञानाचे नाटक मिसळता आले म्हणजे भविष्यकथनाचा पगडा जनमानसावर अधिकच बसतो. त्यावर अशी शंका कोणी विचारतो की, डॉक्टरवर श्रद्धा असल्याशिवाय औषधाचा उपयोग होत नाही, हे कसे?

त्याचे उत्तर असे ही, रोगाचे शारीरिक व मानसिक असे दोन भाग असतात. त्यातला मानसिक भाग डॉक्टरांवरील श्रद्धेमुळे व त्यांच्या व्यक्तिमत्त्वामुळे बरा होऊ शकतो. पण जो शारीरिक भाग आहे तो औषधी गुणधर्मनेच बरा होतो. एखाद्याच्या दुर्दशेचे, संकटकाळाचे वा आपत्तीचे भाकित ज्योतिष्याला क्षणा-दोन क्षणात कसे करता येईल? ज्याप्रमाणे आजारी पडल्याशिवाय कोणी डॉक्टरकडे जात नाही, त्याचप्रमाणे काहीतरी आपत्ती आल्याशिवाय कोणी ज्योतिष्याकडे जात नाही. त्या व्यक्तीचे पेहराव, बोलणे किंवा जो त्या इसमास घेऊन आला त्याने नकळत सांगितलेल्या माहितीवर ज्योतिष्याला आपत्तीच्या स्वरूपाचे आडाखे मांडता येतात. ज्योतिषी सहसा निश्चित असे विधान करत नाहीत. ते निसटती विधाने करतात. म्हणजे, तुम्हाला संसारसुख नाही, तुमच्या वाइटावर तुमचे सहकारी आहेत, ही व अशा तऱ्हेची विधाने संकटग्रस्त माणसाला सुखावह वाटतात.

ज्योतिषी त्यावर उपाय सुचवतो. त्यात जप, धर्मग्रंथांचे वाचन, एखाद्या शुभ खड्याचे ग्रहण, एखादे व्रत, हा सारा भंपकपणा असतो. परिस्थितीने खरोखरच त्या संकटग्रस्त माणसाचे संकटनिवारण झाले तर त्याचे यश ज्योतिष्याला मिळते. आणि तो मनुष्य ज्योतिष्याच्या ज्ञानाची जाहिरात करत गावभर हिंडतो.

ज्यांना त्या व्यक्तीच्या भविष्यकथनात विपरीत अनुभव आलेला असतो, ते काही त्या व्यक्तिविरुद्ध प्रचार करायला बाहेर पडत नाहीत. ज्योतिष्याच्या ज्ञानाचे भांडे त्यामुळे फुटत नाही. माझी अनेक ज्योतिष्यांशी चांगली ओळख आहे. अनेक



बुवांशी, त्यांची आध्यात्मिक मते व आचार पटत नसतानाही, माझा स्नेह आहे.

माझ्या ध्यानात एक गोष्ट आली की, यांपैकी कोणालाही कोणत्याही गोष्टीचे विशेष आकलन झालेले नाही. यांतले एक बुवा तर अनपेक्षितरित्या मरण पावले, जे इतरांचे आजार आध्यात्मिक शक्तीने बरे करत असा त्यांचा दावा होता आणि त्यांच्यावर लिहिलेल्या चरित्रात याबाबत अनेक पुरावे दिले आहेत. हा माणूस देखणा होता. उत्तम वक्ता होता, खानदानी मराठा घराण्यात जन्म पावला होता. प्रथमदर्शनी कोणालाही आकृष्ट करण्याइतके त्याचे व्यक्तिमत्त्व प्रभावी होते. पण त्यांच्याशी अनेक वेळा झालेल्या गाठीभेटींत त्यांचा एकही अलौकिक गुण माझ्या लक्षात आला नाही. प्रत्येक वादात त्यांचा पराभव झाला. त्यांनी सांगितलेली अनेक भाकिते खोटी ठरली !

पुण्यातले डॉ. प. वि. वर्तक हे आपल्याला अतींद्रिय शक्ती आहे व आपण अचूक भविष्यकथन करतो, असा दावा करतात. एकदा त्यांच्या दवाखान्यात मी बसलो होतो. वेळ संध्याकाळची सहाची होती. बेळगावमध्ये गाजलेली एक कुस्ती त्या वेळी सुरू होत होती. मी विचारले नसतानाही, त्यातला कोणता पैलवान, कोणत्या डावाने, किती वेळात जिंकणार हे आपल्या अतींद्रिय शक्तीच्या साहाय्याने त्यांनी मला सांगितले. गंमतीची गोष्ट अशी की, नेमके त्याविरुद्ध घडले व हे सारे आम्ही बसलो असतानाच आम्हाला रेडिओवृत्तातून कळले. आपण त्या घटनेकडे पाहण्यासाठी लावलेली दृष्टी चुकीच्या कोनावर लागल्यामुळे असे झाले असे त्यांचे स्पष्टीकरण होते!

अर्थातच ते खोटे होते, यात शंका नाही. मीही पुष्कळ राजकीय भविष्ये केली आहेत! आणीबाणी येणार व आपल्यावर निर्बंध लादले जाणार हे भाकित मी कितीतरी अगोदर केले होते. व त्याविरुद्ध आपण काहीतरी केले पाहिजे, हे सरसंघचालक बाळासाहेब देवरस यांना खाजगी बैठकीत सांगितले होते. पुढे तर मी तसा लेखच लिहिला. त्या माझ्या राजकीय भविष्याची माझे गुरुतुल्य मित्र थों.वि. देशपांडे यांनी टिंगल केली. ज्या वेळेस ही चर्चा चालली होती, त्या वेळेसच आणीबाणी पुकारली गेली.

हे भाकित मी काही अलौकिक शक्तीच्या आधारे केलेले नव्हते. राजकीय स्थिती ज्याप्रमाणे बदलत होती त्याप्रमाणे इंदिराजींना अन्य काही पर्याय नव्हता एवढेच माझे म्हणणे होते. म्हणूनच अशी भाकिते करताना ग्रह-गोलांचे ज्ञान, एखादा ग्रह वक्री असतो, किंवा साडेसातीचा तो आरंभ किंवा अखेर असते, या गोष्टींचा काहीही संबंध नसतो. बरोबर आलेल्या भाकितांपेक्षा चुकलेल्या भाकितांची संख्या अधिक असते. म्हणूनच ज्योतिष हे कोणत्याही अर्थाने विश्वसनीय नाही. वेळ घालवण्याचे उत्तम साधन म्हणून हा खेळ करायला हरकत नाही. मात्र त्यावर विश्वासून त्याच्या आहारी जाणे हे धोक्याचे असते. आपल्याला

जी गोष्ट करायचीच असते, तिला ज्योतिष्याने दुजोरा दिला तर आपल्या प्रयत्नांना अधिक धार येईल. परंतु एखादी गोष्ट करणे आवश्यक असेल आणि ज्योतिषाने त्यात मोडता घातला तर ती गोष्ट करण्याचे टाळू मात्र नये. नियती बदलणे कोणाच्या हातात नसते, नियती बदलण्याचे सामर्थ्य असणारे माझ्या माहितीत कोणीही नाहीत व कोणी असेल असेही वाटत नाही. पण आपल्याला सृष्टीचे रहस्य समजले, आपल्याजवळ दैवी शक्ती आहे, भूत-भविष्य-वर्तमान या त्रिकालांवर आपली सत्ता आहे, आपण कोणतीही गोष्ट घडवू शकतो असा जे कोणी दावा सांगत असतील ते तुमची फसवणूक करत असतात. चुकून एखादे भाकित खरे ठरले तरी आपण त्याच्यावर विश्वास ठेवू नये. तो योगायोग आहे असेच मानावे आणि तेच आपल्या हिताचे आहे.

ग. वा. बेहेरे



# ज्योतिष : एक तर्कटशास्त्र
## (उपोद्घात)

इतिहासपूर्व काळात माणूस जेव्हापासून शेती करू लागला, तेव्हापासून त्याची उत्क्रांती झपाट्याने होत गेली. निसर्गातील अनेक गूढं उकलण्यासाठी तो धडपडू लागला. त्यांच्यात त्याला काही नियमितपणा आढळला. पण त्यातील काही गूढांची उकल त्याला आजतागायतही झालेली नाहीय. सर्वात महत्त्वाचं म्हणजे अनैतिक पेशींपासून जीव निर्माण होतो कसा. अमिनो आम्ले त्यासाठी आवश्यक आहेत हे जरी त्याने शोधून काढले असले तरी त्यात नेमका जीव कसा धरतो हे काही अजून उकललेलं नाही. त्यावर संशोधन चालू आहे. तसंच जन्मापूर्वी आणि मृत्यूनंतर काय घडते ह्याविषयीही ठिकठिकाणी विचारमंथन आणि संशोधन सुरू आहे.

अशा या अनाकलनीय गोष्टींमुळं तो दिङ्मूढ होतो. त्याच्या या दिङ्मुढतेला आधार देण्यासाठी तो मग या सृष्टीचा कोणीतरी एक नियंता असावा असं मानतो. आणि याच अनाकलनीयतेमुळं त्याच्या मनात एक प्रकारची भीती वास करीत असते. त्या भयातून बाहेर पडण्यासाठी त्याला आधाराची गरज लागते. ती गरज तो देव, सृष्टीचा नियंता तसेच ज्योतिषशास्त्र व त्यासाठी लागणारे कर्मकांड यातून शमवायचा प्रयत्न करतो.

पण हा आधार खरोखरच भरभक्कम आहे का? तो शास्त्रीय कसोट्यांवर टिकणारा आहे का? की आपल्या कमकुवत मनाला तात्पुरतं समाधान देणारा फसवा आहे ? हा विचार आपण कधी केलाय का? ह्या आधाराची जरा चिकित्सा केली तर त्यातून का निष्पन्न होते? ज्योतिषशास्त्र हे शास्त्र असेल तर ते शास्त्रीय कसोट्यांवर का टिकत नाही?

एकीकडे आपला विज्ञानावर विश्वास असतो. पण त्याचबरोबर वैज्ञानिक कसोट्या न लावता काही गोष्टी आंधळेपणानं सत्य म्हणून स्वीकारण्याकडेही आपला कल असतो. ज्योतिषशास्त्राला आपले सांस्कृतिक संचित समजून आणि भृगुसंहितेला प्रमाण मानून आपण जन्मकुंडली, हस्तरेषा, ललाटरेषा यांचे वाचन करून आपला भूतकाळ व भविष्यकाळ शोधण्याचा प्रयत्न करीत असतो.

शास्त्रीय आधार म्हणून जन्मकुंडली मांडताना ज्योतिषी अचूक जन्मवेळेचा आग्रह धरतात. आता जन्मवेळ नेमकी कोणती मानावी? मुलाचं डोकं दिसायला लागते ती वेळ? की मूल पूर्णपणे जगात प्रवेश करते ती वेळ? की

ते पहिला श्वास घेऊन ट्यांहँ करते ती वेळ? की सर्वात प्रथम स्त्रीबीज आणि पुंबीजाचं मिलन होतं ती वेळ? की या मिलनानंतर ज्या क्षणी त्या पेशींमध्ये जीव निर्माण होतो ती वेळ? ह्या प्रश्नांच्या उत्तराची एकवाक्यता अजूनही भल्या भल्या ज्योतिषमार्तंडांमध्येही आढळत नाही. मग अशा प्रकारे तयार झालेली जन्मकुंडली ही शास्त्रीय मानायची काय?

बरे ते असो. कुंडलीतील ग्रहमानानुसार एखाद्या व्यक्तीच्या आयुष्यात घडणाऱ्या घडामोडी होणे जर अटळ असेल तर त्या अमुक एक प्रकाराने ग्रहशांती, उपासतापास इत्यादी कर्मकांड केल्यावर टळू शकतात यावर विश्वास तरी कसा ठेवायचा? याचा अर्थ अशा अटळ घडामोडींवर ताबा मिळवण्याइतपत माणसाचा आत्मविश्वास जर आहे तर तो ह्या कर्मकांडाशिवाय का वापरू शकत नाही? माणूस जर लाखो किलोमीटर अंतरावरील ग्रहांवर आपल्या मंत्रशक्तीने आणि अनुष्ठानांनी हुकूमत चालवून त्यांना वठणीवर आणू शकतो, तर एवढा प्रबळ माणूस आज दुःखात का? गरिबीत का? त्याच्या प्राक्तनाचा भोग म्हणून की पूर्वजन्मीचे पाप म्हणून?

जरा डोळसपणे विचार केला तर आपल्याला असे आढळून येईल की ह्यात ग्रहताऱ्यांचा काहीही दोष नाही. प्राक्तन आणि पूर्वजन्माचा तर नाहीच नाही. ह्या सगळ्या दुःखाचं मूळ आहे राजकीय आणि सामाजिक परिस्थितीत! त्याचाच तो परिपाक आहे. सत्ताधाऱ्यांना आणि भटाभिक्षुकांना जनसामान्यांवरील आपली पकड ढिली करायची नाहीय. हे जनसामान्य जर असेच दुःखात पिचत राहिले, आत्मविश्वासहीन जगले, अंधश्रद्धेच्या गर्तेतच फिरले, कुठल्या तरी भयगंडांनी पछाडलेले असले, रोटीरोजीच्या चिंतेने ग्रस्त असले, तरच त्यांची सत्तास्थाने टिकून रहातील. त्यासाठी त्यांना देवाचा, ज्योतिषाचा बागुलबुवा उभा करणे भागच असते. जर सर्वसामान्य जनता विचार करू लागली, जागृत झाली, प्रश्नांची चिकित्सा करू लागली तर ह्यांचे चालायचे कसे? उत्पन्नाचं – तेही सहजगत्या मिळणाऱ्या – साधन एवढ्या सहजासहजी सोडायचं कसं? म्हणूनच ज्योतिष हे शास्त्र आहे असं आपल्या मनावर वर्षानुवर्षे ह्या तथाकथित विद्वानांनी आपले हितसंबंध जपण्यासाठी ठसवलं आहे. 'ठेविले अनंते तैसेची रहावे । चित्ती असो द्यावे समाधान ॥' असे पढवून ह्या सत्ताकारण्यांनी आपल्याला उपासतापास, कर्मकांडाचे फसवे समाधान देण्याचे कार्य नियमितपणे इमानेइतबारे चालवले आहे, हे आता तरी आपण लक्षात घेणार आहोत काय?

फार वर्षांपूर्वी माणूस उत्क्रांत होत होता तेव्हा त्याला आपली पृथ्वी कशी आहे? सूर्य काय आहे? चंद्र काय आहे? आकाशातील तारे म्हणजे काय? पाऊस कसा पडतो? असे अनेक प्रश्न पडत होते. त्या त्या वेळच्या त्याच्या उत्क्रांत अवस्थेप्रमाणे तो त्यांची उत्तरेही शोधण्याचा प्रयत्न करीत होता. ह्या



उत्तरांमध्ये काळानुरूप बदलही होत गेले. पण हे बदल सहजासहजी झालेले नाहीत. धर्माच्या, कर्मकांडाच्या नावाखाली ह्या बदलांना विरोध होतच राहील. पण परिस्थितीच्या आणि नवज्ञानाच्या प्रचंड रेट्यामुळे हा बदल होतच राहिला. त्याला धर्ममार्तंडही रोखू शकले नाहीत.

म्हणूनच सुरवातीच्या काळात ज्या ज्या गोष्टींमुळे आपल्या जीवनात अर्थ प्राप्त झाला आहे, त्यांचे ऋण म्हणून, त्याच्या पोटी कृतज्ञता व्यक्त करावी म्हणून, त्यांच्या पूजाअर्चाचा जन्म झाला. पण ह्या कृतज्ञतेचे रूपांतर कालांतराने कर्मकांडात आणि माणसाला भविष्याच्या भयगंडात टाकण्यात झाले. आज सूर्य, चंद्र, तारे आदी काय आहेत हे आपल्याला कळले आहे. पाऊस कसा पडतो तेही उमगले आहे. आणि मुख्य म्हणजे त्यांची पूजाअर्चा वा इतर कोणतेही कर्मकांड केले नाही तरी ते नियमितपणे त्यांच्या त्यांच्या शास्त्रीय नियमानुसार त्यांची कर्मे करीतच रहाणार आहेत. मग कुंडलीत सूर्य, चंद्र, आदींना स्थान देण्यात काय बरे अर्थ आहे? त्यांच्या पोटी कृतज्ञता असणे वेगळे आणि त्यांचा आधार घेऊन ज्योतिष्यांनी सामान्य माणसाला घाबरवून सोडणे वेगळे.

मूळात जन्मकुंडलीत सूर्य, चंद्र, राहू व केतू ह्यांना स्थान देऊन आणि त्यांना ग्रह मानून आपण आपले अज्ञानच प्रकट करीत असतो. सूर्य हा तारा आहे. चंद्र पृथ्वीचा उपग्रह आहे. राहू व केतू हे चंद्राची भ्रमणपातळी आणि पृथ्वीची भ्रमणपातळी यांच्यामध्ये सुमारे साडेपाच अंशाचा कोन असल्याने, ते दोन भ्रमणमार्ग जिथे छेदतात ते छेदनबिंदू आहेत. त्यांना आपण शास्त्रीय परिभाषेत भरदसंपात आणि वसंतसंपात बिंदू म्हणतो. आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे, ज्या पृथ्वीवर आपण रहातो, तिला ह्या कुंडलीत स्थानच नाही. लाखो किलोमीटर अंतरावरील हे ग्रहतारे जर मानवावर, त्याच्या भविष्यावर परिणाम करू शकतात तर तो माणूस ज्या पृथ्वीवर जन्मला ती काहीच परिणाम करू शकत नाही? ह्याला कुंडलीतील फोलपणा म्हणावा नाही तर काय? उलट एका अर्थाने ह्या पृथ्वीवरील ज्या प्रदेशात तो जन्मला तो प्रदेश, त्याचा परिसर, तेथील राजकीय परिस्थिती, तेथील समाजकारण हे सर्व खऱ्या अर्थाने त्यांच्या भविष्यावर परिणाम करणारे असतात. कुंडलीतील लहानशा चौकटीत कोंडून बिचाऱ्या ह्या ग्रहताऱ्यांवर आपण उगीचच अन्याय करीत असतो.

आकाशातील ग्रहताऱ्यांचा व त्यांच्या परिभ्रमणाचा मानवी जीवनावर बरावाईट परिणाम होतो हे तात्पुरते जरी मान्य केले तरी तो एकाच वेळी जन्मलेल्या, एकाच अक्षांशावर जन्मलेल्या अथवा एकाच दवाखान्यात एकाच क्षणी जन्मलेल्या बालकांवर सारखाच व्हायला हवा. पण तसे घडत नाही. प्रत्येकाचे भविष्य वेगवेगळे घडलेले दिसते. जसे सूर्यचंद्राचा पृथ्वीवरील होणाऱ्या भरतीओहोटीवर एकसारखाच परिणाम सर्वत्र दिसतो तसेच मानवाच्या बाबतीतही आणि प्राण्यांच्या बाबतीतही घडायला हवे. पण तसे घडताना दिसत नाही.

तसेच वैज्ञानिक परिणाम होत असेल तर तो सगळ्याच ग्रहताऱ्यांचा व्हायला हवा. कुंडलीतील मर्यादित चौकटीत मनःपूतपणे कोंबून बसवलेल्या मूठभर ग्रहांचाच (?) व्हायला हवा. ह्या अट्टाहासाला काय म्हणावे बरे?

जन्मकुंडलीत किंवा राशीचक्र मांडण्याविषयी जी ज्योतिषविषयक पायाभूत गृहीतके आहेत त्यात प्रचंड अज्ञान सामावलेले दिसते. ग्रहांची स्थिती जशी विशिष्ट वेळी दिसते तशी ती नसते. कारण ग्रहांचे मानवी दृष्टीला होणारे ज्ञान हे त्या ग्रहाच्या अंतरानुरूप बदलत असते. सूर्य दिसायला साडेआठ मिनिटांचा कालावधी लागतो तर शनी दिसायला त्याहीपेक्षा जास्त वेळ लागेल. म्हणजे आपण पहातो तो एकप्रकारे शिळा प्रकाश असतो. त्यामुळे ग्रहस्थिती हाच मुळात भ्रम आहे. कारण तेवढ्या काळात गुरू शनी आदी ग्रहांची जागाही बदललेली असते.

दुसरे असे की, काही ग्रह हे विशिष्ट स्थानी उच्चीचे आणि निचीचे मानले जातात. उदा. रवि सिंहाचा स्वामी आहे पण तो मेषेत उच्चीचा तर तुळेतील दहाव्या अंशात निचीचा मानला जातो. ह्या उच्चनीच राशी आणि त्यांचे अंश ठरविले कोणी आणि कोणत्या नियमांनी? ग्रहांच्या पार्श्वभागी असणारी रास त्याचे सबलत्व काढून त्याला जर दुर्बल बनवू शकते तर ग्रहांपेक्षा राशीच परिणामकारक ठरू शकत नाहीत काय? मग कुंडलीतील ग्रहस्थानांना कोणता अर्थ उरला?

निसर्गनियमानुसार तीच ती ग्रहस्थिती विशिष्ट कालावधीत नियमितपणे पुनःपुन्हा येत असते. तर मग महान व्यक्तींच्या बाबतीत जन्मतिथी आणि जन्मवेळेची वारंवारता का आढळत नाही? महात्मा गांधी, महात्मा ज्योतिबा फुले, बुद्ध, कबीर यांसारख्या महात्म्यांच्या जन्मवेळी असणारी ग्रहस्थिती जेव्हा कधी येईल तो क्षण पकडून नेमके त्याच वेळी शस्त्रक्रिया करून शेकडो बालकांना जन्म देण्याइतपत विज्ञान पुढे गेलेले असताना, ज्योतिषमार्तंड अशा वेळा काढून जगाला कल्याणकारी ठरणाऱ्या विभूतींची पैदास करण्यासाठी का बरे सहाय्यभूत ठरत नाहीत? ह्या सत्कर्माबद्दल त्यांना सारे जग दुवा देणार नाही काय? त्यांच्या आयुष्यभराची कायमची ददात मिटेल.

पण आपले ज्योतिषी बसले आहेत मंगळ आणि शनीच्या राशीवर. बिच्चारे ते ग्रह! व्हॉयजर यानाने पाठवलेली मंगळ आणि शनीविषयीची भरपूर माहिती यांच्या गावीच नाही. रात्रीच्या वेळी तांबूस रंगाचा दिसणारा मंगळ हा ग्रह किती विलोभनीय दिसतो. तर शनीची कडी कधी तरी तुम्ही दुर्बिणीतून पाहिली आहेत काय? अहाहा ! त्या बिचाऱ्या शनीच्या मागे खरी तर आपणच साडेसाती लावली आहे. मंगळ आणि शनी बिचारे आपापल्या नियमानुसार सूर्याभोवती परिभ्रमण करताहेत. आपल्या डोळ्यांना सुखावताहेत. पण आपण मात्र त्यांना अस्पृश्य आणि दलित करून टाकले आहे आपल्या कुंडलीत. ह्या वेडगळपणाला काय म्हणावे?



या ना त्या ग्रहाचा खडा अंगठीच्या कोंदणात बसवून आपण त्या अफाट मोठ्या ग्रहांना लगाम घालू शकतो अशी समजूत फक्त बुद्धी गहाण टाकलेली माणसेच करून घेऊ शकतात.

स्वतःच्या अपयशाबद्दल स्वतःखेरीज दुसऱ्या कुणाला तरी जबाबदार धरणे हे सर्वांनाच सोयीचे असते. म्हणूनच ग्रहांना वेठीला धरून पोटार्थी ज्योतिष्यांचे फावते. गूढ चिन्हे, क्लिष्ट आकडेमोड व अगम्य खाणाखुणा करून विद्वत्तेचा आव आणत हे सगळे ज्योतिषी एकजात संदिग्ध आणि मोघम भाषा वापरत असतात. आता हेच पहा ना, पृथ्वीवर येणाऱ्या अरिष्टांची संगती ते धूमकेतू आणि ग्रहणांशी लावतात. खरं तरं पृथ्वीवर दररोजच अनेक उत्पात घडत असतात. कुठे ना कुठे तरी ते लागू पडणारच असतं. पण त्यासाठी धूमकेतू आणि ग्रहणाची काय आवश्यकता आहे?

एकंदरीत काय तर ज्योतिषशास्त्र हे अनुमान लावण्याचे शास्त्र आहे. दहा प्रश्नांची होय किंवा नाही अशी उत्तरे द्यायची झाल्यास एकाही प्रश्नाचे उत्तर येत नसेल तर आपण जसे सगळी उत्तरे होय किंवा नाही अशा प्रकारे लिहितो, मग त्यातील कधी सात बरोबर येतील, तर कधी पाच, तर कधी तीनच, असं आहे ज्योतिषशास्त्राचं.

आज स्वातंत्र्य मिळून बेचाळीस वर्षं झाली तरी भारतीयांच्या हातावर शिक्षणाची रेषा उमटलेलीच नाही? जपानमध्ये ६ ऑगस्ट १९४६ साली हिरोशिमावर अणुबॉम्ब टाकून एका क्षणात लाखो लोक जळून खाक झाले. ह्या सर्वांच्या कुंडल्यांतील ग्रहयोग काय एकच होते? दुसऱ्या महायुद्धानंतर रशिया आणि चीनमध्ये शिक्षणाचा आणि सुबत्तेचा प्रसार झाला याचे कारण काय तेथील प्रत्येकाच्या हातावर शिक्षण आणि धनरेषा होत्या म्हणून? की आपल्याच देशातील सगळ्यांची ग्रहदशा विपरीत आहे म्हणून आपणास अनेक समस्यांना सामोरे जावे लागत आहे? हे कोणत्या तर्काच्या आधारावर पटावं?

आजपर्यंत ज्योतिषाला वैज्ञानिक निकष लावण्याचे प्रयत्न अनेक शास्त्रज्ञांनी केलेत. ज्योतिष्यांनी केलेले दावे खरे ठरतात का ते पहाण्याचे परिश्रमही वैज्ञानिकांनी घेतले आहेत. पण वैज्ञानिक विषयाला लागणारा पाया, या विषयाला म्हणजे ज्योतिषाला लाभलेला नाही हेच चिकित्सेअंती सिद्ध झाले आहे.

पृथ्वीच्या ध्रुव प्रदेशात रहाणाऱ्या लोकांना सहा महिने दिवस व सहा महिने रात्र अशा दिनमानात दिवस काढावे लागतात. आणि वर्षातून काही काळ तर तेथे आकाशस्थ ग्रहज्योती दिसतच नाहीत. उत्तरध्रुवावर दक्षिण गोलार्धातील वा विषयवृत्तावरील ग्रहतारे दिसूच शकत नाहीत. मग त्यांचा परिणाम ह्या माणसांवर होतो का? कारण त्या माणसांच्या कुंडल्याच ह्या ग्रहांशिवाय तयार होऊ शकणार

नाहीत. की त्यांना जन्मकुंडल्यांची गरज नाही? याचा अर्थ त्यांना भविष्यच नाही काय?

या सर्व विवेचनावरून आपल्या लक्षात येईल की, भविष्य हे माणसाच्या प्रयत्नांच्या कसोटीवर घडवता येते. त्यासाठी गरज असते आत्मविश्‍वासाची, चिकित्सेची आणि जिद्दीची. ज्योतिषशास्त्र मात्र कमकुवत मनाला आणखी दुर्बल करते. भ्याड बनवते. शहाण्या माणसांनी ज्योतिष्यांच्या नादी लागून स्वतःला भविष्याच्या गर्तेत लोटून घेऊ नये हेच खरे. प्रयत्नांची आणि कष्टांची कास धरली तरच आजची परिस्थिती बदलू शकेल.



# खगोलशास्त्राची सुरुवात

"काका, फार पूर्वीच्या काळी लोकांना म्हणे असं वाटत होतं की, पृथ्वी चपटी आहे. खरंय का हो हे?" विशालला पूर्वीच्या लोकांचा हा समज ऐकून आश्चर्य वाटलं होतं. म्हणून त्यान कुतूहलानं काकांना प्रश्न केला.

"खरंच आहे ते. त्या काळच्या लोकांना पृथ्वी ही उपड्या बशीसारखी चपटी वाटायची. त्यामुळं समुद्रपर्यटन करताना ही मंडळी क्षितिजापर्यंत कधी जायचीच नाहीत. का ते माहिताय?"

"नाही बा."

"जरा डोकं चालव की."

"अं.... अं."

"अरे साधंय उत्तर. त्यांना असं वाटायचं की जर आपण क्षितिजापर्यंत गेलो तर कडेला पोहोचू आणि खाली पडून जाऊ. बशीच्या कडेवरून पाण्याचे थेंब पडतात तसे. म्हणून ते नेहमी किनाऱ्या – किनाऱ्यावरूनच प्रवास करत."

हे ऐकून विशालला मोठमोठ्यानं हसायला यायला लागलं. कडेवरून खाली पडण्याची कल्पनाच त्याला हास्यास्पद वाटत होती. पण त्या काळच्या लोकांना मात्र खरोखरच ही भीती वाटत होती.

"पण काका, पृथ्वी तर गोल आहे हे लहान मूलही सांगू शकतं."

"ही फार नंतरची गोष्ट झाली." काकांनी विशालला मध्येच थांबवत बोलायला सुरवात केली. "प्राचीन काळी आपल्याकडील लोकांना पृथ्वी ही शेष नागानं आपल्या डोक्यावर तोलून धरली आहे असं वाटायचं. तर ग्रीक लोकांना वाटायचं की पृथ्वी ही कासवाच्या पाठीसारखी आहे. म्हणून ही कासवानंच तोलून धरली आहे. तर काही लोकांना वाटायचं, प्रचंड हत्तीच्या कळपानं पृथ्वीला आपल्या पाठीवर तोललं आहे. म्हणून कुणीही कडेला जायचा प्रयत्न करत नसे. कारण कडेला गेलं की...."

"धपकन् खाली पडू." विशालनं काकांचं वाक्य हसत हसत पूर्ण केलं.

"पण हळूहळू आकाशातील ताऱ्यांच्या निरीक्षणानं त्यांच्या असं लक्षात यायला लागलं होतं की हे तारे ठराविक काळानं पुन्हा पुन्हा दिसताहेत याचा अर्थ हे तारे पृथ्वीभोवती फिरत असले पाहिजेत. म्हणजे पृथ्वी ही ह्या विश्वाचा

केंद्र असून सारं आकाश पृथ्वीभोवती फिरत असलं पाहिजे."

"म्हणजे काका, याचा अर्थ झाला – पृथ्वी स्थिर असून तिच्याभोवती संपूर्ण विश्व गोल फिरतंय. पण खरं तर उलटंच आहे."

"हे सगळं तू आज जरी सहज बोलत असलास तरी त्यामागे प्रचंड इतिहास आहे. समुद्रातील लांबवर जाणाऱ्या बोटीच्या निरीक्षणातून आर्किमिडीजनं असं मांडलं की पृथ्वी गोल आहे."

"ते कसं काय?"

"तू समुद्रात दूरवर जाणाऱ्या जहाजाचं कधी निरीक्षण केलंयस? अशा दूरवर जाणाऱ्या जहाजाचा पहिल्यांदा पाण्याच्या लगतचा भाग दिसत नाही. नंतर वरचा आणि सर्वात शेवटी शीड दिसेनासं होतं. जहाज जवळ येताना याच्या अगदी उलट क्रिया घडते. म्हणजे प्रथम शीड, नंतर मध्यम भाग आणि शेवटी खालचा भाग टप्प्याटप्प्यानं दिसायला लागतो. नाहीतर असं कर ना. तू एक चेंडू घे आणि त्यावरून आगपेटीची उभी काडी फिरव आणि काय दिसतं ते सांग मला."

विशालनं ताबडतोब धावत जाऊन चेंडू आणि काडी आणली. ती काडी तो चेंडूभोवती फिरवायला लागला.

"हो रे हो काका, ही काडी फिरवताना ती चेंडूच्या पलीकडे जाताना त्या जहाजासारखंच घडतं. पहिल्यांदा खालचा, मग वरचा आणि सर्वात शेवटी तिचं डोकं नाहीसं होतं."

"हे झालं एक निरीक्षण. आपल्याकडे आर्यभटानं चंद्रग्रहणाच्या निरीक्षणावरून पृथ्वीची सावली चंद्रावर वर्तुळाकार पडते यावरून पृथ्वी गोल आहे असं अनुमान काढलं होतं. पण ही झाली दुसऱ्या शतकातली गोष्ट. ख्रि. पू. पाचव्या शतकात पायथ्यागोरसनं असं सांगितलं होतं की, खगोल स्थिर असून पृथ्वी चल आहे. पण ती गोल आहे हे मात्र त्याला कळलं नव्हतं. दुसऱ्या शतकात आरीस्पकर्सनेही सांगितलं की, सूर्य, तारे स्थिर असून पृथ्वी त्यांच्याभोवती फिरतेय. पण प्रत्यक्ष पृथ्वीभ्रमण अनुभवायला येत नसल्यामुळे त्यांचं म्हणणं कुणी मानलंच नाही. अगदी सातव्या शतकापर्यंत भारतात जरी पृथ्वी गोल आहे हे मत मान्य झालेलं असलं तरी पाश्चिमात्य जगतात मात्र ती स्थिर असून चपटी आहे असंच मानलं जायचं. आणि पृथ्वीला विश्वाचा केंद्र मानून त्यांनी धार्मिक आधार दिला होता. त्याविरुद्ध ब्र काढणंही मुश्कील होतं. म्हणूनच सोळाव्या शतकात बुनोनं जेव्हा असं विधानं केलं की 'पृथ्वी गोल असून ती सूर्याभोवती फिरतेय.' तेव्हा तर त्या काळच्या धर्मगुरूंनी हे धर्मबाह्य, पाखंडी मत आहे असा गिल्ला करून त्याला चक्क जिवंत जाळलं."



"काय? जिवंत जाळलं! कमाल आहे! किती भयानक गोष्ट आहे ही ! पृथ्वी गोल आहे म्हणण्याची ही शिक्षा !"

"होय रे बाबा; इतिहास हा असाच दाहक घटनांनी भरला आहे. ही तर संघर्षाची सुरुवात होती. त्यानंतर सोळाव्या शतकात कोपर्निकसनं सूर्यकुलाची कल्पना मांडली. म्हणजे असं की, पृथ्वीसकट बुध, शुक्र, मंगळ, गुरू आणि शनीही सूर्याभोवती विवक्षित कक्षांतून फिरताहेत. ह्या सगळ्यांची मिळून आपली सूर्यमाला तयार झाली आहे. पण त्यांचं हे मत प्रसिद्ध करण्यास तो जिवंतपणी धजावला नाही. त्याच्या मृत्यूनंतरच ही कल्पना प्रसिद्ध केली गेली.

"एवढा पगडा होता धर्मगुरूंचा त्या काळी !"

"त्या काळी कशाला, आजही काही प्रमाणात आहेच की. ज्योतिष, शास्त्राला धर्माचा आधार मिळालेला आपण पहातोच आहोत ना? चतुर्थीचा चंद्र आणि संकष्टी हा संबंध आपण लावतोच ना? ते असो. कोपर्निकसनंतर सतराव्या शतकात गॅलिलियोने प्रथमच दुर्बिणीतून ह्या ग्रह – ताऱ्यांची निरीक्षणं केली. त्यावरून त्यालाही बुनोचं आणि कापर्निकसचं म्हणणं पटलं. म्हणून त्याने सूर्याभवती पृथ्वी फिरतेय, पृथ्वी गोल आहे आणि आपली पृथ्वी सूर्यमालेचा एक घटक आहे, हे मत ठामपणे मांडलं. पण त्याचा परिणाम काय झाला माहीत आहे ?"

"काय ? गॅलिलियोलाही धर्मगुरूंनी छळलं की काय ?"

"हो नं. त्याला त्याच्या या पाखंडी मताबद्दल धर्मगुरूंनी कैदेत टाकलं. त्या कारावासात त्याचे अनन्वित हाल केले. त्याला वेडा ठरवण्यापर्यंत त्यांची मजल गेली. धर्मबाह्य वर्तन करतोस काय? मग भोग त्याची फळं. म्हणून त्याला एवढा छळला की बिचारा कैदेत विकलांग झाला. त्याची दृष्टीही अधू झाली. शेवटी हाल सहन न होऊन त्याला लिहून द्यावं लागलं की, मी जे मत मांडलं ते खोटं म्हणून."

"अरेरे ! बिच्चारा !"

"नुसती सहानुभूती दाखवून उपयोगी नाही. तर ह्या इतिहासापासून आपण काहीतरी शिकलं पाहिजे. गॅलिलीयोनं कबुली दिल्यानंतरच त्याला सोडण्यात आलं. पण शेवटपर्यंत तो नजरकैदेत होता. त्याच्या नंतर न्यूटनने गुरुत्वाकर्षणाचा महान सिद्धांत मांडला. पण त्याला फारसा विरोध झाला नाही. कारण या मधल्या काळात लोकांना दुर्बिणीचा उपयोग कळला होता. तिच्या सहाय्यानं अनेकांनी निरीक्षणं करून त्यांना गॅलिलियोचं म्हणणंही पटत चाललं होतं. त्याचबरोबर विज्ञानाच्या इतर क्षेत्रात विविध शोध लागून औद्योगिक क्रांतीही होऊ लागली होती. त्यामुळें न्यूटनला फारसा त्रास झाला नाही. नंतर केप्लरनं गुरुत्वाकर्षणाच्या

सिद्धांतावर आणि कोपर्निकसच्या सूर्यकुलाच्या कल्पनेवर अभ्यास करून त्या काळी माहीत असलेल्या ग्रहांची सूर्यापासूनची अंतरे निश्चित केली."

"म्हणजे सतराव्या शतकाच्या शेवटी शेवटी लोकांमध्ये पृथ्वी गोल आहे, ती स्वतःभोवती फिरत फिरत सूर्याभोवती फिरतेय. ती चपटी नाही आणि विश्वाचा केंद्रही नाही; ही मतं स्थिर व्हायला लागली होती म्हणायची काय."

"खरंय तुझं म्हणणं. पण त्यासाठी किती संघर्ष करावा लागला हे तुला कळलं ना? तरीही ग्रह, तारे, धूमकेतू, ग्रहणं हे नेमकं कसं घडतं? त्यांचा निर्माता कोण? ह्या प्रश्नांची उत्तरे माहीत नसल्यामुळे त्याविषयी जगभर खुळचट कल्पनांचा प्रसार झाला होता. धूमकेतूमुळे पृथ्वीवर अरिष्ट येतं. ग्रहणकाळात राहू-केतू चंद्र-सूर्याला गिळतात. गर्भार स्त्रीनं हालचाल करू नये, नाहीतर मूल व्यंगात्मक होतं. ग्रह आणि ताऱ्यांचा मानवी जीवनावर परिणाम होतो. अशा अनेक अवैज्ञानिक कल्पनांवर लोकांचा विश्वास होता; काही प्रमाणात आजही आहे."

"खरं तर काका, ह्या सगळ्या खगोलीय घटना म्हणजे निसर्गाचे आविष्कार आहेत. वैज्ञानिक नियमांनी त्यांचं मार्गक्रमण चालू असतं. त्यांचा मानवी जीवनावर कसा परिणाम होईल?"

"तसं असलं तरी माणसाला या निसर्गाचा निर्माता कोण याविषयी कुतूहल आहे. तसंच आपल्या जन्ममृत्यूविषयीही त्याला अनेक प्रश्न पडतात. मृत्यूनंतर काय घडतं? जन्मापूर्वी आपण कुठे होतो? आपल्या भविष्यात काय घडणार आहे? अशा अनेक प्रश्नांतून सुटका मिळण्यासाठी त्याने ह्या ग्रहताऱ्यांना हाताशी धरलं. आणि खगोलशास्त्रातील ग्रहगणिताची बेमालूमपणे सरमिसळ करून ज्योतिषशास्त्राचा पाया रचला. माणसाच्या मनात वसणाऱ्या भीतीचा फायदा घेऊन ग्रह-ताऱ्यांविषयी अंधश्रद्धा पसरवल्या. आणि त्यातून आपल्या हातात मूठभरांनी समाजकारण तसंच सत्ताकारण राखण्याचा प्रयत्न केला. त्यामुळे अनेक शतके मानवी प्रगती होऊ शकली नाही. ती होण्यासाठी शास्त्रज्ञांना प्रचंड संघर्ष करावा लागला. प्रसंगी प्राणही द्यावे लागले. म्हणूनच म्हणतो बेटा, ज्योतिषशास्त्रापेक्षा ठोस विज्ञानावर विश्वास ठेव आणि डोळे उघडे ठेवून निरीक्षण कर. त्यासाठी संघर्ष करावा लागला तरी हरकत नाही. कारण शेवटी संघर्षातूनच विकास होतो हे लक्षात ठेव."



# पंचांगातील खगोलशास्त्र

"काका, काल आमच्या शाळेत एक मोठ्ठे ज्योतिषी आले होते. त्यांनी असं सांगितलं की, आपले पूर्वज महान होते. त्यांनी सांगितलं नुसत्या डोळ्यांनी ग्रह-ताऱ्यांचं निरीक्षण करून त्यांचा मानवावर परिणाम होतो, अंक्षांश-रेखांशावरून जन्मवेळेची कुंडली मांडली तर त्याचं भविष्य तंतोतंत खरं सांगता येते. आणि शेवटी म्हणाले, की ह्या सर्व अभ्यासावरून ज्योतिषशास्त्र हे पूर्णपणे वैज्ञानिक आहे, म्हणूनच तर तुमच्या अभ्यासात ग्रहताऱ्यांचा अभ्यास समाविष्ट केलाय आणि न् काका, त्यांनी ग्रह-ताऱ्यांविषयी मंगळाचा कोप, शनीची साडेसाती, ग्रहणकालात कसं वागायचं, कोणते खडे वापरायचे हेही सांगितलं."

"व्वाऽ !! म्हणजे एकंदरीत तुम्हाला ह्या ज्योतिषीमहाशयांनी ज्योतिषशास्त्र वैज्ञानिकतेवर आधारलेलं आहे हे चांगलंच पटवलं तरं !"

"तुम्हाला काय म्हणायचंय, तसं नाहीय?"

"हे बघ, आपले पूर्वज महान होते यात शंकाच नाही. त्यांनी आकाशस्थ ग्रहगोलांचं म्हणजे ज्योतींचं निरीक्षण करून खगोलशास्त्राचा भरभक्कम पाया घातला हे निश्चित. त्या काळच्या प्रगल्भतेनुसार त्यांनी खगोलशास्त्राचे नंतर तीन स्कंध म्हणजे भाग केले."

"ते कोणते?"

"पहिला सिद्धांत - स्कंध किंवा गणित - स्कंध. दुसरा संहिता - स्कंध आणि तिसरा होरा किंवा जातक - स्कंध. यातील पहिला स्कंधच काय तो खगोलशास्त्राचा भाग आहे. आणि उरलेले दोन ज्योतिषाचे."

"ते का म्हणून?"

"हे बघ, सूर्योदय आणि सूर्यास्ताच्या निरीक्षणातून पहिल्यांदा दिवस आणि रात्रीची कल्पना त्यांना आली असणार. त्यांच्या असंही लक्षात आलं की, सूर्योदय आणि सूर्यास्त दररोज आकाशातली जागा बदलतो आहे. पर्वताच्या मध्यभागी होणारा सूर्योदय काही दिवसांनी दक्षिणगामी होतो. दक्षिणेत एका विशिष्ट बिंदूपर्यंत पोहोचल्यावर परत तो मध्याकडं यायला लागतो. तिथून तो उत्तरगामी होतो. एका ठराविक बिंदूपर्यंत उत्तरेला गेल्यावर पुन्हा मध्याकडं यायला लागतो. यावरून त्यांनी सूर्याच्या दक्षिणायन आणि उत्तरायनाची कल्पना मांडली. त्यांना असंही दिसलं की, सूर्य दक्षिणेकडे जाताना दिवस लहान होतो आणि उत्तरेकडं–"

"– जाताना मोठा होतो. माहिताय मला. आमच्या शाळेत शिकवलंय." विशालनं काकांचं वाक्य पूर्ण केलं.

"एवढंच नव्हे तर त्यांना ठराविक दिवसांनी चंद्राचा क्षय आणि वृद्धी होतानाही दिसत होती. आणि ह्या घटना परत परत विशिष्ट काळात घडत होत्या. त्यावरून चांद्रमासाची, शुक्लपक्ष आणि वद्यपक्षाची मांडणी केली त्यांनी. त्यानंतर त्यांना ऋतूंची कल्पना आली. ग्रहगती, ग्रहणे यांविषयी थोडीबहुत माहिती होऊ लागली. पण या सर्व माहितीला काळाच्या मर्यादा होत्या. हे कोण घडवून आणतं हे त्यांना कळत नव्हतं. म्हणून मग त्या अज्ञात शक्तीला शरण जाणे हा त्यांच्यापुढं एकच पर्याय होता. त्यातूनच खगोलशास्त्रात पुढं संहिता - स्कंध आणि होरास्कंध निर्माण झाले."

"म्हणजे आतापर्यंत तुम्ही सांगितलं ते खगोलशास्त्र होतं."

"बरोबर आहे तुझं म्हणणं. वरील घटना गणितानं निश्चित करता येतात. म्हणून त्याला गणित किंवा सिद्धान्त-स्कंध म्हणतात. पण या निरीक्षणाबरोबरच जेव्हा आदर आणि भीती या भावनांचे मिश्रण झालं तेव्हा ग्रहण, ग्रहयुती, नक्षत्रस्थिती, धूमकेतू यांचे संबंध सामाजिक, राजकीय, वैयक्तिक घडामोडींशी जोडले गेले. नैसर्गिक आपत्ती म्हणून या खगोलीय घटना घोषित केल्या गेल्या. त्यावर उपाय म्हणून जपजाप्य, अनुष्ठानं शोधली गेली. अमुक एक ग्रहस्थिती असताना अमुक कामे करावीत असे संकेत निर्माण झाले. यातूनच संहिता - स्कंध तयार झाला. नंतर ह्यात आणखी भर पडून बालकाच्या जन्मवेळी असलेली ग्रहस्थिती विचारात घेऊन त्याच्या आयुष्यातील चढउतार, सुखदुःखे यांचा संबंध जोडला जाऊन तिसरा स्कंध म्हणजे होरा किंवा जातक - स्कंध निर्माण झाला. या स्कंधातच लग्नाला शुभाशुभग्रह, कारकग्रह, ग्रहांचा सगुणादी निर्णय, कुंडलीत कोणत्या स्थानी काय पहावे? कोणता ग्रह कोणते रोग उत्पन्न करतो? ग्रहांची फले इत्यादी माहिती भरलेली आहे."

"काका, पण त्यांनी सांगितलेल्या आणि आता तुम्ही सांगताय त्या सूर्यतारे, ग्रह, ग्रहयुती, नक्षत्र, राशी या सगळ्या संज्ञा तर सारख्याच आहेत. तरी तुम्ही म्हणता की –"

"कळलं मला तुला काय म्हणायचंय ते." काका विशालला मध्येच तोडत म्हणाले, "हे बघ, ह्या सगळ्या संज्ञा खगोलशास्त्रीय आहेत. म्हणजे गणित. स्कंधातील आहेत. त्यावरून व्यक्तिगत आयुष्यातील सुखदुःखाच्या घटना सांगणे किंवा चढउतार सांगणे हा झाला फलिताचा भाग. म्हणजे संहिता - स्कंध आणि होरा - स्कंधाचा. म्हणजेच ज्योतिषशास्त्रात खगोलशास्त्राची सरमिसळ झालेली आहे. ह्या दोहोंतील सीमारेषा अगदीच पुसट आहेत. त्या लक्षात येणं महत्त्वाच. भल्याभल्यांनाही ते जमत नाही."



"मग कसं करायचं?" विशालही आता थोडासा गडबडला. कारण कालचं भाषण त्याच्या डोक्यात आता शंकांचं थैमान घालत होतं.

"असं बघ, कुडंली तयार करण्यासाठी पंचांगाची गरज लागते. पंचांग हे गणित - सिद्धांतावर आधारलेलं असून त्यातून ग्रहस्थिती निश्चित करता येते. आता पंचांग म्हणजे 'पाच अंगे.' ती कोणती म्हणशील तर तिथी, नक्षत्र, वार, योग आणि करण."

"यांची वैशिष्ट्यं काय?" विशालनं कुतूहलानं विचारलं. कारण हे त्याला नवीन होतं.

"चंद्राचे सूर्यापासून १२ अंशाचे अंतर पडण्यास जो काल लागतो त्याला तिथी म्हणतात. तुला माहितच आहे की, चंद्र हा पृथ्वीपेक्षाही जास्त वेगानं फिरतोय. त्यामुळं चंद्र आणि सूर्य यांतील अंतर दररोज बदलतं. हे अंतर ह्या दोन वस्तूंच्या आपल्या डोळ्यांशी होणाऱ्या कोनात मोजलं जातं. त्यावरून १२ अंशाचा हा काळ आहे. तो पृथ्वीवर २० तास ते २८ तास यादरम्यान असू शकतो."

"हा आठ तासांचा बदल का होतो काका?"

"साधंय. चंद्र जरी पृथ्वीभोवती वर्तुळाकार फिरत असला तरी पृथ्वी मात्र सूर्याभोवती लंबवर्तुळाकार मार्गानं फिरतेय. म्हणून दररोज काही फरक त्या काळात पडणारच."

"काका हे कळलं मला. पण आठवड्याचे सात वार असतात तरी त्याला आठवडा का म्हणतात? आणि त्यांचा पंचांगाशी काय संबंध?"

"हे बघ, प्रत्येक सातव्या वारानंतर आठवा वार पहिला वार असतो. म्हणून सात दिवसांनंतर पहिल्यापासून सुरू होणाऱ्या चक्राला आठवडा म्हणतात. आता प्रत्येक दिवस हा काही सारख्या लांबीचा नसतो. त्यावर उपाय म्हणून वर्षभरातील सर्व दिवसांची सरासरी काढून प्रत्येक दिवस त्या सरासरीएवढ्या लांबीचा मानला. त्याला सरासरी सौर दिवस म्हणतात. ह्या सौर दिवसाचे २४ समान भाग केले. त्या प्रत्येक भागाला –"

"– तास म्हणतात." विशालनं काकांचं वाक्य पूर्ण केलं.

"हो. पण पंचांगात त्याला होरा म्हणतात. त्याचे अधिपत्य ग्रहास वाटून दिले असता सूर्योदयाच्या वेळी ज्या ग्रहाचा होरा असेल तो त्या दिवशीचा वार. म्हणजे वाराचा काळ हा एका सूर्योदयापासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंतचा होतो."

"काका, नक्षत्र २७ आहेत नाही? पण ही सत्तावीसच का?"

"काय आहे की, पृथ्वी सूर्याभोवती ज्या एका कक्षेत फिरते त्याला पृथ्वीचा

आयनिक मार्ग म्हणतात. या भ्रमणमार्गाच्या काल्पनिक रेषेला क्रांतिवृत्त म्हणतात. आकाशात ह्या क्रांतिवृत्ताच्या जवळपास जे तारकासमूह येतात त्यांना नक्षत्र म्हणतात. ह्या नक्षत्रांचे २७ समान भाग केल्यास प्रत्येक विभाग १३ अंश २० कलांचा होतो. आता २७ च नक्षत्र का, तर चंद्राला पृथ्वीभोवती एक पूर्ण प्रदक्षिणा करण्यास २७ दिवस लागतात. ३६० अंश म्हणजे एक प्रदक्षिणा. याचाच अर्थ, कोनात्मक दृष्ट्या ३६० भागिले २७ = १३.२०. त्यावरून चंद्र ज्या नक्षत्रात असतो ते रोजचे नक्षत्र. तसंच सूर्य सुमारे १४ दिवस एका नक्षत्रात असतो."

"हे झालं नक्षत्रांविषयी. पण योग आणि करण म्हणजे काय?"

"चंद्र व सूर्य यांची एकत्रित गती मध्यमानाने म्हणजे सरासरी ८४९ कला आणि ४३ विकलांएवढी असते. पैकी ८०० कलांस जो काळ लागतो त्याला योग म्हणतात. आणि तिथीचा अर्धा भाग म्हणजे करण. या पाच अंगांपैकी योग आणि करण फारसे व्यवहारोपयोगी नसल्याने ते प्रचारात नाहीत.

"हे सगळं तर खगोलशास्त्र झालं. मग ज्योतिषी पंचांगाचा वापर का करतात?" विशालनं अगदीच बाळबोध प्रश्न विचारला.

"खरं म्हटलं तर फलज्योतिषातील सर्व संकल्पना या प्रत्यक्षातील खगोलशास्त्रीय आहेत. पण त्यांना शुभाशुभत्वाचे गुणधर्म चिकटवून त्यांचा व्यक्तिगत जीवनावर परिणाम होतो अशा कल्पना रूढ होऊन फलज्योतिषाचा डोलारा उभा राहिलाय. कुंडली तयार करण्यासाठी ज्या पंचांगाचा वापर केला जातो त्या पंचांगनिर्मितीविषयीही नंतर वाद निर्माण झाले. कारण चांद्रमासावर आधारलेला पंचांग आणि सौरमासावर आधारलेला पंचांग यात परस्परविरुद्ध निष्कर्ष निघतात कधीकधी. आर्यभट्ट, वराहमिहीर, ब्रह्मगुप्त, भास्कराचार्य वगैरे खगोलविदांनी ग्रहताऱ्यांचे वेध घेऊन जी स्थूलनिरीक्षणे केली तीच निरीक्षणे अंतिम आहेत असं म्हणून कसं चालेल?"

"हो नं काका. आज खगोलशास्त्र इतकं पुढं गेलंय की, प्रभावी दुर्बिणींच्या साहाय्यानं कित्येक कोटी प्रकाशवर्षं अंतरावरचे तारे पाहू शकतो. आपल्या सूर्यमालेतील काही ग्रहांवर तर प्रत्यक्ष याने जाऊन पोहोचलीयत. आणि तेथील अद्ययावत माहिती पुरवताहेत."

"तरीही आपले ज्योतिषी मात्र जुनंच खगोलीय तत्त्वज्ञान उराशी कवटाळून बसले आहेत. हा पूर्वजांविषयीचा दुरभिमान आहे. आता हेच बघ ना, राशिचक्राला आरंभबिंदू हा वस्तुतः चल आहे आणि दरवर्षी तो पश्चिमकेडं सरकतोय. ही वस्तुस्थिती सर्वानाच – अगदी ज्योतिषमार्तंडांनाही – मान्य आहे. त्यावरून मकरसंक्रमण हे २२ डिसेंबरला होते हे मान्य असूनही पूर्वजांना अभिप्रेत



असलेला बिंदू स्थिर मानून १४ जानेवारीला मकरसंक्रांत साजरी करणे हे गतानुगतिकतेचं लक्षण आहे एवढंही त्यांना कळू नये?"

"मग ते खगोलशास्त्राचा आधार कशासाठी घेतात?"

"लोकांना निव्वळ बनवण्यासाठी. आपण काहीतरी गणिती आकडेमोड करून आपल्या संस्कृतीतील महत्त्वाच्या शास्त्राधारे उपाय सुचवतो आहोत हे ठसवण्यासाठी. लोकांना भविष्यातील अज्ञाताचं कुतूहल आणि निसर्गातील घटनांविषयी भीती असते. त्याचाच फायदा घेतात हे ज्योतिषमार्तंड. त्यायोगे माणसांना घाबरवून, त्यांच्या मानसिकतेचा फायदा घेऊन स्वतःची आयती पोटं भरण्याचा धंदा करतात ही मंडळी."

"अरे, काका, एवढे करपताय काय?"

"नाहीतर काय करू? विज्ञानाची एवढी प्रचंड प्रगती होऊनही हे आपले बसलेयत कुंडलीत राहू-केतू घेवून आणि 'दे दान सुटे गिराण' करीत. एकंदरीत ह्या फलज्योतिष्याचा पायाच वादाचा आहे. मग त्यावर आधारित फलितांची इमारत डळमळीत असल्यास नवल ते काय? तरीही त्या इमारतीचा आश्रय घेण्यास लोक धडपडतात. अगदी सुशिक्षित सुद्धा. विज्ञानाचं लेबल लावून. खरं तर आपलं ज्योतिषशास्त्र म्हणजे 'जुनं ते सोनं आणि न चालणारं नाणं' या उक्तीप्रमाणे आहे.

# खगोलशास्त्रात ज्योतिषाची सरमिसळ

"काका, मागे कुंडलीचं गौडबंगाल सांगताना तुम्ही कुंडलीचा फोलपणा दाखवलात. ती कशी पत्यांच्या बंगल्याप्रमाणे डळमळीत आहे हेही दाखवलंत. पण त्यातील जे खरे ग्रह आहेत ते म्हणे काही वेळेला **वक्री** होतात आणि माणसाला त्रास देतात तर काही वेळेला **मार्गी** होतात आणि ते अशा वेळेस माणसाला लाभदायक असतात असं म्हणतात, ते काय खोटंय?" विशालला ज्योतिषशास्त्रातला फोलपणा कळला होता तरी त्याच्या ह्या शंकांचं काही निरसन झालं नव्हतं. म्हणून त्यानं काकांना प्रश्न केला.

"खरं तर, वक्री आणि मार्गी ह्या वैज्ञानिक संज्ञा आहेत."

"अच्छा."

"तुला माहीतच आहे की, आपल्या सूर्यमालेतील प्रत्येक ग्रह आपापल्या कक्षेतून, ठराविक वेगानं सूर्याभोवती परिभ्रमण करताहेत ते."

"होय. बुध सूर्याभोवती २८ दिवसांत एक फेरी पूर्ण करतो. शुक्राला २२५ दिवस लागतात, मंगळाला तीच फेरी पूर्ण करण्यासाठी ६८७ दिवस लागतात. तर गुरू आणि शनी यांना अनुक्रमे सुमारे १२ वर्षे आणि ३० वर्षे लागतात. परवाच मी वाचलं हे."

"शाब्बास. सुट्टीचा सदुपयोग करतोयस तू. बरं, तर सांगायचा मुद्दा असा की, ह्या ग्रहांना सूर्याभोवती एक फेरी पूर्ण करावयास लागणारा हा काळ त्यांच्या सूर्यापासूनच्या अंतरावर तसंच त्याच्या परिभ्रमणाच्या वेगावरही अवलंबून असतो."

"म्हणजे काका, पृथ्वी सूर्याभोवती ३६५ दिवसांत फिरते तेव्हा आपण एक वर्ष झालं म्हणतो. या हिशोबानं बुधावरचं एक वर्ष फक्त ८८ दिवसांचं होईल तर शनीवरील एक वर्ष म्हणजे आपली ३० वर्षे भरतील. गंमतच आहे काका."

"आता हे ग्रह आपापल्या वेगानं फिरत असताना आकाशाच्या पार्श्वभूमीवर पृथ्वीवरून कधीकधी मागे जाताना दिसतात तर कधी पुढे पुढे."

"ते कसं काय? जरा स्पष्ट करा ना."

"आपण एक साधं उदाहरण घेऊ या. समज, एका रस्त्यावरून दोन गाड्या चालल्यात. एका गाडीचा वेग दुसऱ्या गाडीच्या वेगापेक्षा जास्त आहे. तर पहिल्या गाडीतील माणसाला असं वाटेल की, दुसरी गाडी पुढं जात नसून मागेच जातेय. बरोबर?"

"हं."

"आणि जर समजा आता दुसरी गाडी जास्त वेगाने निघाली तर अशा वेळेस पहिल्या गाडीतील माणसाला असं वाटेल की...."

"...दुसरी गाडी पुढं जातेय आणि आपण मागे जातोय." विशालला समजल्यामुळं त्यानं काकांचं वाक्य पूर्ण केलं.

"तर थोड्याफार प्रमाणात अशाच प्रकारे प्रकाशात काही वेळेला हे ग्रह पृथ्वीवरून आकाशात पाहिलं असता मागे जाताना दिसतात, तेव्हा ते **वक्री** झाले असं म्हणतात. तर जेव्हा ते पुढे जाताना दिसतात तेव्हा ते **मार्गी** झाले असं म्हणतात. खरं तर पृथ्वी आणि ते ग्रह एकाच दिशेनं परिभ्रमण करीत असतात."

"म्हणजे ग्रहांच्या वक्री होण्याचा आणि मार्गी लागण्याचा माणसाच्या जीवनाशी काही संबंध नाही ! पण मग ज्योतिषी का घाबरतात?"

"हे सारं खगोलज्ञान गणिताच्या नियमांनी बद्ध आहे. त्याचा माणसाच्या जीवनाशी बराचसा संबंध जोडून हे ज्योतिषी त्या बिचाऱ्या ग्रहांनाच वेठीशी धरून माणसाचं जीवन वक्री आणि मार्गी करत असतात. कारण हे ग्रह काही त्यांना जाब विचारायला येणार नसतात की, आपल्यासारखे सामान्य अज्ञजन भीतीपोटी विषाची परिक्षा का घ्या म्हणून त्यांना धारेवर धरणार नसतात. हे मानसशास्त्र पक्कं ह्या ज्योतिषांना माहीत असतं. म्हणून तर त्यांचं फावतं."

"पण मग त्या युत्या होतात त्याचं काय? दोनतीन वर्षांपूर्वी नवग्रही झाली होती." विशालला बरंचसं पटत होतं तरी ज्योतिषशास्त्र एकदम टाकून द्यायला त्याचं मन धजावत नव्हतं. त्याचं वाक्य पूर्ण होण्याआधीच काकांनी विचारलं, "काय झालं रे त्या वेळी. काही विपरीत घडलं, मारे सारे ज्योतिषी नवग्रही होणार म्हणून लोकांना अनुष्ठानं, जपजाप्य करायला सांगत होते. साऱ्यांना अगदी घाबरवून सोडलं होतं. घडलं काही !"

"नाही. पण.... पण..."

"अरे पण, पण काय ! युती म्हणजे एखादा तारा आणि ग्रह अथवा अनेक ग्रह एकमेकांच्या अगदी जवळ येणं. – परवाच २४ एप्रिलला नाही का ज्येष्ठा - चंद्र यांची युती झाली. म्हणजे होतं काय की हे ग्रह फिरत असताना काही ठराविक कालांतरानं एखाद्या ताऱ्याजवळ येतात. तेव्हा युती झाली असं आपण म्हणतो. ते इतके जवळ येतात की, कधी कधी एकाचं तेज दुसऱ्यामुळं लुप्त होऊ शकते. विशेषतः चंद्राशी होणाऱ्या युतीबाबतीत बरेचदा असं घडतं."

"अष्टग्रही किंवा नवग्रही होते म्हणजे हे सगळे ग्रह एका विशिष्ट कोनात

एकाच दिशेला येतात. पण खरं तर ते एकमेकांपासून खूप लांब असतात, नाही का?"

"बरोबर आहे तुझी शंका. आकाशाच्या पार्श्वभूमीवर ते जवळ दिसले तरी त्यांच्यातील अंतर हे प्रचंड असतं. द्विमिती दृश्यामुळं त्यांची खोली आपल्याला जाणवत नाही. म्हणून ते आकाशात, सपाट फळ्यावर जसे बिंदू एकच प्रतलात दिसतात, तसे हे तारेही एकाच प्रतलात असल्यासारखे वाटतात. म्हणूनच अष्टग्रही, नवग्रही या लहानसहान युत्या हे निसर्गाचे आवर्तनीय, म्हणजे पुन्हा पुन्हा घडणारे आविष्कार आहेत. माणसावर संकट सोडणारी राक्षसी नव्हे."

"याचा अर्थ, काका, ग्रहांचं वक्री होणं, मार्गी होणं, युत्या-प्रतियुत्या, हे सगळं खगोलशास्त्र आहे. ज्योतिषशास्त्र नव्हेच."

"आता कसं शहाण्यासारखं बोललास !"



# माणसाच्या दुबळेपणाचा फायदा घेणारे 'ज्योतिष'!

"काका, आपण वजन करू या." गाडीची वाट पहात उभ्या असलेल्या काकांचं रेल्वे स्थानकावरील वजनकाट्याकडे लक्ष वेधत विशालनं विचारणा केली.

"बरं कर."

पडत्या फळाची आज्ञा घेऊन विशालनं वजनकाट्याकडे धाव घेतली. काट्यावर उभा राहिला. लालपांढरे चक्र थांबेपर्यंत वाट पाहिली आणि खाचेत नाणी सरकवली. तिकीट हातात आल्याबरोबर वजनाकडे एक कटाक्ष टाकून लगेच मागचं भविष्य वाचू लागला.

"आपको दुसरों की मदत करने में आनंद आता है. अतः आपको जल्दही बडा सम्मान मिलेगा ।"

विशालनं आपलं भविष्य काकांना सांगितलं. काका गालातल्या गालात हसले.

"का काका, हसलात का?"

"अशी भविष्यं कधी खरी ठरत असतात काय? उगाच तुम्हा लोकांना खूष करण्यासाठी काहीतरी लिहिलेलं असतं झालं."

"म्हणजे ज्योतिष हे शास्त्र नाही?"

"आता मला सांग, या काट्यात सगळी तिकिटं की, ज्यावर भविष्य लिहिलंय, ती एक गठ्ठा ओळीत लावून ठेवलेली असतात. पैसे टाकल्यावर ओळीनं एकेक तिकीट खाली पडतं. मग त्या तिकिटावर असलेलं भविष्य हे कोणत्या कसोटीवर ठरतं. तर तो एक शक्याशक्यतेचा छाप-काट्यासारखा खेळ होतो. बरेचदा तुम्ही खूष व्हाल अशीच वाक्यं त्या तिकिटांवर असतात. दोन घटका करमणूक यापेक्षा त्याला फारसं महत्त्व नाही."

"पण मग लोक ज्योतिष्याच्या मागे का लागतात?"

"भविष्यकाळाविषयीचं कुतूहल हे एक आणि दुसरं म्हणजे आपल्याला कठीण वाटणाऱ्या प्रश्नांची उकल कशी होईल हे जाणून घेण्याची इच्छा. खरं तर

आपले प्रश्न आपणच निर्माण करतो आणि आपल्या प्रयत्नांनी ते आपल्याला सोडवताही येतात. पण आपल्याला सुखाचा शॉर्टकट हवा असतो. म्हणून काही जपजाप्य, अनुष्ठानं किंवा खडे घेऊन पूजा-अर्चा करणं असल्या निरर्थक माध्यमांचा आधार घेऊन ते मिळवायचा प्रयत्न करतो. आता मला सांग, माझ्यासाठी तू अनुष्ठान वा एकादशणी करून माझं भविष्य कसं काय बदलवू शकतोस? ते तर माझ्याच हातात असतं नं? म्हणजे हे ज्योतिषी तुमच्या अंधश्रद्धेचा फायदा घेऊन त्यांची पोटं भरत असतात."

"म्हणजे दर रविवारी प्रसिद्ध होणारं तसंच दररोज छापलं जाणारं दैनिकातील भविष्यही खोटंच असतं म्हणायचं का?"

"अर्थात. तू पाच एक वर्तमानपत्रं गोळा करून एकाच राशीचं सगळ्यातील भविष्य वाच. तुलाच हसायला येईल. इतकं ते परस्परविरोधी असतं. बरेचदा तर दररोजचं भविष्य लिहिताना वर्तमानपत्रातले कर्मचारीच शब्द बदलून मागचे-पुढचे करत भविष्याचा कॉलम भरत असतात."

"वर्तमानपत्र हे आपण समाजप्रबोधनाचं कार्य करणारं माध्यम आहे असं समजतो नं?"

"मार्मिक प्रश्न विचारून तू मला पेचात टाकलंस बघ. आज हे हत्यार धंद्याच्या चौकटीत अडकून पडल्यामुळे प्रबोधनापेक्षा व्यापारी तर्काचाच आधी विचार केला जातो सध्या. राजकारणी बातम्या, खून, बलात्कार, अत्याचार, हाणामाऱ्या, दरोडे हे संपल्यावर प्रबोधनाचा विचार केला जातो हल्ली. त्यामुळे भविष्य हे शास्त्र नसतानाही त्याचा विचार करावाच लागतो. कारण ते वाचण्यासाठी अंधश्रद्ध लोक मोठ्या प्रमाणात वर्तमानपत्र विकत घेतात. पत्राचा खप वाढतो."

"काका, आपल्या घरात पहिल्यांदाच येणारा ज्योतिषी मग आपले भविष्य कसं काय सांगू शकतो?"

"हा तर बराच सामान्य ज्ञानाचा आणि तीक्ष्ण नजरेचा तसेच निरीक्षणाच्या कौशल्याचा मामला असतो. घरात शिरल्याबरोबर ज्योतिषी ते घर नवीन लग्न झालेल्या जोडप्याचं आहे की मुलाबाळांनी भरलेलं आहे, ह्याचा अंदाज घेऊ लागतो. घरातल्या मांडणीवरून, फर्निचरवरून त्यांच्या आर्थिक स्तरासंबंधी तर्क करतो. यजमानांशी बोलताना मिळणाऱ्या सूचक शब्दांतून तो आपलं म्हणणं हळूहळू मांडायला सुरुवात करतो. ते एवढं मोघम असतं की, थोड्याफार फरकानं सर्वांनाच लागू होणारं असतं."

"फक्त नावावरून ते आपली जन्मतारीख कशी काय सांगू शकतात? हेही आश्चर्यच नाही का?"



"इथे मात्र ते गणिताचा आधार घेतात. कुंडलीतील ग्रहांच्या जागांवरून गणिती आकडेमोडीनं जन्मतारीख काढणं सोपं आहे. पंचांगाच्या सहाय्यानंही ते करता येतं आणि आपल्याकडे सर्वसाधारणपणे नाव ही कुंडलीवरूनच ठेवली जातात. त्याचा फायदा ज्योतिष्यांना मिळतो. ज्यांची नावं कुंडलीप्रमाणे नाहीत त्यांची जन्मतारीख ते कधीच अचूकपणे सांगू शकत नाहीत."

"पण इतर घटनांबद्दल काय?"

"मला एक सांग, सर्वसाधारणपणे आपले प्रश्न तरी कशा स्वरूपाचे असतात? कुणाला मुलगा होत नसतो. कुणाच्या मुलीचं लग्न जुळत नसतं. कुणाचा आजार बरीच वर्षे बरा होत नाही. कुणाला नोकरी नसते. तर कुणाला बढती केव्हा मिळेल हे हवे असते आणि सगळ्यांनाच धनसंपत्तीच्या राशींवर लोळायचं असतं. आणि असेच काही आता ९९ टक्के प्रश्न जर अशा स्वरूपाचे असतील, तर समाजाचं म्हणजे जातिव्यवस्था, शोषणाच्या पद्धती, राजकारण, नोकरशाही इत्यादी व्यवस्थांचं भान ठेवून, थोडासा मानसशास्त्राचा अभ्यास करून माणसाच्या मनात घुसणं काही कठीण नसतं. ज्योतिषी नेमकं हेच करत असतात. सर्वसाधारणपणे आपलं मन अनुकूल तेच ऐकण्याच्या मूडमध्ये असतं आणि प्रतिकूल परिस्थितीला घाबरणारं असतं. त्याचाही फायदा हे लोक घेत असतात."

"म्हणजे हे सगळं तर्कच आहेत म्हणायला हवं."

"हो नं. माणसाच्या दुबळेपणाचा फायदा घेऊन, आपली तुंबडी भरण्याचा उद्योग आहे हा. कुंडली हा प्रकार तर या सर्वांवर मात करणारा आहे. पण त्याविषयी पुन्हा केव्हातरी सांगेन."

"तसं कशाला, पुढच्याच आठवड्यात सुट्टी आहे तेव्हाच सांगा ना.

# कुंडलीचे गौडबंगाल

"काका, आज त्या कुंडलीबद्दल जरा अधिक सांगा ना."

"हो. परवा तुला कबूल केलंय तेव्हा सांगायलाच हवं. आणि ते कळणंही महत्त्वाचं आहे. हे बघ, जन्मकुंडलीत सूर्य, चंद्र, राहू, केतू, मंगळ, बुध, शुक्र, शनी आणि गुरू असे नऊ ग्रह आहेत."

"काय काका थापा ठोकता ! सूर्य हा काय ग्रह आहे? तो तर एक प्रचंड तारा आहे. चंद्र हा तर पृथ्वीचा उपग्रह आहे, हे तर आता सर्वांनाच माहिती आहे. आणि राहू-केतू हे तर काल्पनिकच! पृथ्वी आणि चंद्र यांच्या भ्रमणकक्षा काल्पनिकरित्या जिथे दोन ठिकाणी छेदतात, ते छेदनबिंदू म्हणजेच राहू आणि केतू. कक्षा छेदतात त्याचं कारण चंद्राची भ्रमणकक्षा पृथ्वीच्या कक्षेला सुमारे सव्वापाच अंशाचा कोन करून असते. हे तर आम्हाला शाळेत शिकवलंय. उगाच बनवाबनवी करायची नाही बरं का ! मी काय भोट मामा वाटलो तुम्हाला?"

"अरे, मी मनाचं फेकत नाहीय. मोठमोठे ज्योतिषमार्तंडच असं सांगतात आणि त्या आधारे जन्मकुंडल्या तयार करतात. त्यांनी या ग्रहांची त्यांच्या म्हणण्याप्रमाणे स्थानंही निश्चित केलीयत. त्यामुळे ते कधी वक्री होतात तर कधी लाभदायी अशी फलंही ते सांगतात."

"काका, मुळातच जर हा पाया चुकीचा असेल तर त्यावर उभारलेला हा फलज्योतिषाचा डोलारा भक्कम कसा असेल? आणि त्याची फलं तशी खरी कशी ठरतील?"

"अगदी खरं बोललास बघ तू. म्हणूनच मी म्हणतो, ज्योतिषशास्त्र हे ठोकताळ्याचं, अनमानधपक्याचं शास्त्र आहे. छापकाट करताना कधी तीन वेळ छाप पडेल तर कधी पाच वेळा तर कधी सात वेळासुद्धा, तसंच आहे हे."

"आता उरलेले जे ग्रह आहेत ते तर खगोलशास्त्राच्या नियमानुसार सूर्याभोवती आणि स्वतःभोवती विशिष्ट अल्पावधीत भ्रमण करत आहेत. त्यांचा कसा काय मानवी जीवनावर परिणाम होईल?"

"त्याला ज्योतिष्यांकडे उत्तर आहे. चंद्रसूर्याच्या आकर्षणामुळं नाही का समुद्रातील पाण्यावर भरती - ओहोटीचा परिणाम होत? मग माणूस तर ९० टक्के पाण्याने युक्त आहे. त्यावर परिणाम झालाच पाहिजे."

"काका, आमच्या भूगोलाच्या पुस्तकात असं आहे की, भरती - ओहोटी संपूर्ण पृथ्वीवर सतत होत असते. फक्त एकाच भागावर असं नाही. आणि तीसुद्धा फक्त दोन ते चार मीटर उंचीची. म्हणजे समुद्राच्या आकारमानाने काहीच नाही. त्याच वेळेला जमिनीलाही दोन ते पाच सें.मी.ची भरती येते. पण आपल्याला कधी जाणवतच नाही. म्हणजे जो काही परिणाम व्हायला पाहिजे तो पृथ्वीवरील सर्व माणसांवर एकदमच व्हायला हवा."

"तुझ्यासारख्या लहान मुलाला देखील एवढं कळतं. पण आमचे ज्योतिषमार्तंड बसलेत चुकीचा सांस्कृतिक वारसा सांभाळीत. जुन्यापुराण्या काळचं टाकाऊ ज्ञान सोडून नवीन संशोधन करायला तयारच नाहीत. उलट आपलंच म्हणणं खरं करण्यासाठी आधुनिक विज्ञानाचा फसवा आधार घेऊन स्वतःला तसंच लोकांनाही फसवत आहेत. त्यांना कळतच नाही, किंवा कधी कधी जाणूनबुजूनही असेल, पण हे फसवण्याचं काम मात्र ते प्रामाणिकपणे करताहेत. लोकांचा ज्योतिषशास्त्रावर विश्वास बसावा म्हणून त्यांना काही डॉक्टर्स आणि इंजिनीअर्स – एवढंच काय – काही शास्त्रज्ञ सुद्धा सामील आहेत."

"कमाल आहे. एवढं स्वच्छ दिसत असतानाही ही माणसं आंधळ्यासारखी वागतात कशी?"

"आता हेच पहा ना, भरती-ओहोटीचा पृथ्वीवर किती कमी परिणाम दिसतो. मग तो माणसांवर दिसेल का? हे म्हणणं म्हणजे बशीतील पाण्यावर जेवढा परिणाम होईल, तेवढाच काय तो असं म्हणायला हवं. आणि तो तर नगण्यच आहे. पुन्हा तो एखाद्याच माणसावर होईल हे म्हणणं कितपत शहाणपणाचं आहे? झालाच तर सर्व प्राणी आणि वनस्पतींवर जो काही क्षुल्लक प्रमाणात व्हायचा तो तर होतोच आहे. त्यामुळे माणसाचे जीवन काही बदलत नाही. खळबळ काही उडत नाही. ते आपल्या गतीने चालूच असतं."

"हो नं. खळबळ उडवतो ती आपणच. उगाच कुणाच्या मागे साडेसाती लावून शनी ग्रहाविषयी गैरसमज पसरवायचा. तर कुणा 'मंगळ्या' मुलीला भीतीच्या सावटाखाली ठेवून त्रास द्यायचा."

"आज अगदी विचारवंतासारखा बोलतोयस."

"आता मी काही लहान नाही काका, चांगला दहावीत आलोय. ग्रह आणि सूर्यमाला, आकाशगंगा, धूमकेतू, नक्षत्र यांविषयी बरंच काही वाचलंय मी. मला तरी कुठे हे ग्रह असे त्रासदायक वाटले नाहीत. उलट चांदण्या रात्री हा निसर्गाचा आविष्कार पहाताना मन कसं भरून येतं. विशाल होतं."

"हो नं. दुर्बिणीतून शनीकडे कधी पाहिलंयस?"

"वा, काय झकास दिसतो तो. त्याच्या वलयांसकट ! परवाच तर आमच्या शाळेत मुंबईच्या खगोलमंडळाने कार्यक्रम केला. मी नाही का रात्री आठ वाजता

शाळेत गेलो होतो."

"तर मला सांग, असा हा सुंदर शनी कधी तरी माणसाच्या मागे साडेसाती लावेल का? आजच्या संशोधनानं असं दाखवून दिलंय की, शनीचा एक उपग्रह — टिपन त्याचं नाव — तेथील वातावरण असं आहे की माणसाला थोडाफार बदल करून सहज जगता येईल."

"आणि काका, मंगळ आहे नं, तो तर दुर्बिणीतून असा मस्त तांबडाभडक दिसतो की, काही पुसू नका. त्याच्या उत्तर आणि दक्षिण ध्रुवावरील बर्फाचे पांढरे ढीगही मस्त दिसतात. आणि त्यावरील कालवे तर सजीव सृष्टीची कल्पना देतात."

"हे तू कुठल्यातरी जुन्या पुस्तकातलं सांगतोयस. सध्या मानवनिर्मित यानं मंगळावर जाऊन आली आहेत. त्यांनी असं सिद्ध केलंय की, तिथे कालवेबिलवे कही नाहीत, ते आहेत मंगळाच्या पृष्ठभागाला पडलेले मोठाले चर. तो लालभडक असायलाही कारण आहे. तेथील मातीत लोखंडाच्या खनिजाचे प्रमाण जास्त आहे. आणि गंजलेलं लोखंड जसं ऑक्सिडीकरणाने तांबडं दिसतं ना, त्यातलाच प्रकार आहे. कोणी एके काळी मंगळावरील बाष्प आणि ऑक्सिजनच्या सान्निध्यात या लोखंडाच्या खनिजाचं गंजणं झालं असावं. त्याचा परिणाम म्हणून तो आज आपल्याला लाल दिसतोय. यावरून तुझ्या लक्षात येईल की, विज्ञान हे एवढं खुलं असतं की, जुन्या चुकीच्या संकल्पना टाकून देऊन दर वेळी नवं आणि जास्त अत्यांकतेकडं जाणारं तत्त्व स्वीकारत रहातं. पण आपलं ज्योतिषशास्त्र हे समजून घ्यायला तयारच नाही."

"हो न. म्हणूनच त्यांना आजही असं वाटतं की सूर्य, चंद्र, राहू व केतू हे ग्रह आहेत. आणि त्याचा मानवी जीवनावर परिणाम होतो."

"आणखी एक गंमत आहे. ह्या कुंडलीचा पाया मुळी 'पृथ्वी स्थिर आणि तीच्याभोवती सूर्य, चंद्र आणि इतर ग्रह तारे फिरताहेत' ह्या गृहीत कृत्यावर आधारलेला आहे."

"असं चुकीच्या पायावर आधारलेलं ज्योतिषशास्त्र काय आणि कसं भविष्य घडणार? कप्पाळ !!"



# ग्रहण कसे होते ?

गणपती-विसर्जनाच्या दुसऱ्या दिवशी संध्याकाळी रमेश, काका आणि विशाल दादरच्या चौपाटीवर फिरायला आले होते. तेथे त्यांना अनेक अर्धवट विरघळलेल्या अवस्थेतील गणेशमूर्ती दिसत होत्या. तर काही छिन्नविच्छिन्न झालेल्या होत्या. समुद्राला प्रचंड ओहोटी होती. या पार्श्वभूमीवर ते चित्र जरा भेसूरच दिसत होते.

"काका, काल तर या वेळेला भरती होती आणि आज ओहोटी आहे; म्हणजे भरती-ओहोटीच्या वेळा बदलत्या आहेत, नाही?"

"भरती-ओहोटी ही चंद्रस्थितीवर अवलंबून असते. साधारणतः चंद्र आकाशात उच्च स्थानी असला म्हणजे भरती येते. आणि या वेळा सतत बदलत असतात. कारण चंद्राचा परिभ्रमणाचा वेग. त्यामुळेच तो दररोज ५० मिनिटे उशिरा उगवतो."

"पण काही वेळा आपल्याला चंद्र पूर्ण दिसतो, तर काही वेळा दिसतच नाही, असं का?" विशालने मध्येच विचारलं.

"चंद्र दररोज आपल्याला वेगवेगळ्या आकारात दिसतो, त्यालाही त्याची भ्रमणस्थिती कारणीभूत आहे. आपल्याला हे माहीतच आहे की, पृथ्वी सूर्याभोवती व चंद्र पृथ्वीभोवती असे परस्परांभोवती प्रदक्षिणा घालताहेत. हे आपण आता प्रत्यक्षच पाहू या का?"

"होऽ पण ते कसं काय?"

"अरे सोप्पंय. समज, मी सूर्य, तू पृथ्वी आणि हा विशाल चंद्र. बरं, आता तू माझ्याभोवती फिरायला सुरुवात कर, पण एक लक्षात ठेव बरं का, हे फिरणं करत असताना तू स्वतःभोवतीही फिरायचंय. देवळात नाही का माणसं स्वतःभोवती गोल फिरत देवाला प्रदक्षिणा घालत, तसंच. आणि विशाल, तू याच्याभोवती — म्हणजे पृथ्वीभोवती त्याचप्रमाणे फिरायचं. हं, करा सुरुवात."

"हं, आता या स्थितीवर तुम्ही थांबा हं, रमेश, सांग बघू, तुझी फिरण्याची दिशा व विशालची कशी आहे?"

"आम्ही बरोबर परस्परांच्या विरुद्ध दिशेला फिरतोय."

"हो, पण मी आता तुमच्या म्हणजे सूर्याच्या आणि रमेशच्या म्हणजे पृथ्वीच्या मध्ये आहे." विशाल म्हणाला. (आकृती १ अ पहा.)




आकृति १ : अमावास्या, पौर्णिमा

"तेव्हा परस्परांभोवती परिभ्रमण करताना जेव्हा असे विरुद्ध दिशेने परिभ्रमण अवस्था येते, तेव्हा चंद्र सूर्याबरोबर युतीत आला असे म्हणतात. या वेळी अमावास्या होते."

"म्हणजे, दुसऱ्या शब्दांत सांगायचं झालं, तर असं म्हणता येईल की, या दिवशी सूर्य व चंद्र जवळजवळ एकाच वेळेला उगवतात. त्यामुळे चंद्र सूर्यप्रकाशात लुप्त होतो आणि म्हणूनच त्या रात्री तो सूर्याचा साथीदार असल्यामुळे आपल्याला दिसत नाही. ही झाली अमावास्या."

"मग काका, पौर्णिमेला बरोबर याच्या उलट स्थिती असेल, नाही ?"

"चल, पुन्हा फेर धरू या. हं, थांबा आता."

"या स्थितीत विशाल, तू सांग बरं तुमच्या परिभ्रमणाच्या दिशा कशा आहेत?"

"आता आम्ही दोघेही एकाच दिशेने फिरतो आहोत आणि आता मी पृथ्वीच्या मागे आलोय; त्यामुळे मला सूर्य दिसत नाहीय."

"अशा वेळेला चंद्र सूर्याबरोबर प्रतियुतीत आहे असे म्हणतात आणि या दिवसाला पौर्णिमा म्हणतात."

ग्रहण कसे होते?






आकृति २ : चंद्राच्या परिभ्रमणाचे प्रतल

"काका, अमावास्या आणि पौर्णिमा या दोन दिवसांत पंधरा दिवसांचं अंतर आहे. म्हणजे एवढ्या दिवसात चंद्राचा पृथ्वीभोवती अर्धा फेरा होतो?"

"होय. आणि या पंधरवड्याला विशिष्ट नावेही आहेत. अमावास्येपासून पौर्णिमेपर्यंतच्या काळास 'शुक्ल पक्ष' म्हणतात; तर पौर्णिमेपासून अमावास्येपर्यंतच्या काळास 'कृष्ण पक्ष' म्हणतात. आपल्याला असंही म्हणता येईल की, चंद्र प्रतियुतीत येत असतानाच्या काळात तो हळूहळू दररोज नियमितपणे मोठा होत जातो. तर युतीत येत असताना तो लहान होत जातो. यांनाच चंद्राच्या कला म्हणतात."

"म्हणजे काका, पृथ्वीची चंद्रावर पडणारी सावली कमी जास्त होत असल्यामुळे आपल्याला या चंद्रकला दिसतात. पण काका, पृथ्वीची सावली पडली म्हणजे ग्रहण लागतं म्हणतात ना? मग दर अमावास्या आणि पौर्णिमेला ग्रहण लागायला हवं."

"तसं होत नाही. याचं कारण पुन्हा चंद्राची भ्रमणकक्षाच बरं का ! आता जरी आपण एकमेकांभोवती फिरत होतो तरी ते एकाच पातळीतलं फिरणं होतं. खरं म्हणजे, चंद्र आणि पृथ्वी हे वेगवेगळ्या पातळ्यांमध्ये फिरत असतात. अगदी अचूक बोलायचं झालं तर असं म्हणावं लागेल, की या दोन पातळ्यांतील फरक

५ पूर्णांक एकचतुर्थांश अंशाचा आहे. त्यामुळे जरी चंद्रावर पृथ्वीची सावली व पृथ्वीवर चंद्राची सावली पडली तरी जोपर्यंत ते एकाच पातळीत अशा अवस्थेत येत नाहीत, तोपर्यंत ग्रहणे होणार नाहीत."

"हां, आता आठवलं. आम्हाला बाईंनी सांगितलं होतं की, चंद्र, पृथ्वी व सूर्य जेव्हा एकाच रेषेत येतात तेव्हाच ग्रहण होते. त्या एका रेषेचा अर्थ आता समजला बरं का !"

"ज्या वेळेला चंद्राची गडद सावली पृथ्वीवर पडते, त्या वेळेस सूर्यग्रहण होते आणि ही स्थिती फक्त ते एकाच पातळीत येतात तेव्हाच निर्माण होते. इतर वेळेला सावली पडली तरी पृथ्वी वेगळ्या पातळीत असल्यामुळे गडद सावलीत येत नाही. एखाद्या विशिष्ट अमावास्येलाच असे घडू शकते." विशाल एकदम कळल्यासारखं म्हणाला.

"आणि ज्या वेळेला पृथ्वीची गडद सावली चंद्रावर पडते तेव्हा चंद्रग्रहण होते. ही स्थिती येण्यासाठी ते एका पातळीत तर यायला हवेतच; पण पुन्हा चंद्र सूर्याबरोबर युतीतही असायला हवा. तेव्हाच कोठे चंद्रग्रहण होईल. इतर वेळेला पातळी वेगळी असल्यामुळे पृथ्वीची सावली पडून फक्त चंद्राच्या कलाच दिसतील; विशाल !"



# ग्रहण आणि अंधश्रद्धा

"काका, आज तुम्हाला मोकळा वेळ आहे का?" विशालनं विचारलं.

"का रे बाबा, काही विशेष?"

"आज किनई, शाळेत आम्ही मुलांनी तयार केलेल्या 'बालमित्र' या मासिकाचा प्रकाशन समारंभ आहे आणि मला आता त्यासाठी प्रमुख पाहुण्यांना आणायला जायचंय. तुम्ही येता?"

"कोण आहेत रे ते?"

"ते महाराष्ट्रातील नामवंत कवी आहेत. त्यांच्या कविता आम्हाला अभ्यासालाही आहेत. आणि बरं का काका, ते खूप चांगलं भाषण देतात म्हणे !"

काकांनी थोडा वेळ विचार केला अन् विशालला म्हणाले, "चल, मीही येतो तुझ्याबरोबर. नाही तरी आज मला जरा मोकळा वेळ आहे. या निमित्तानं त्यांची ओळख तरी होईल."

विशालला हुरूप आला. तो ताबडतोब कपडे करायला गेला. काकांनाही तयार व्हायला सांगितलं आणि पाच मिनिटांतच ते बाहेर पडले.

प्रमुख पाहुण्यांच्या घरी पोहोचल्यावर विशालनं आपली ओळख करून दिली.

"मी विशाल आणि हे माझे विजयकाका."

"नमस्कार. या बसा. अगदी ठरलेल्या वेळेवर आला तुम्ही." पाहुणे म्हणाले.

"हो नं. कार्यक्रम वेळेवर सुरू करायचा आहे नं !" विशाल तत्परतेनं म्हणाला.

तुम्ही काय करता?" पाहुण्यांनी काकांना विचारलं.

"मी सध्या 'अंधश्रद्धा, रूढी, परंपरा आणि वैज्ञानिक दृष्टिकोन' या विषयावर संशोधन करतोय."

"अच्छाऽ, तुम्हाला असं वाटतं ! या अंधश्रद्धा नाहीशा होतील?"

"निश्चितच. पण त्यासाठी माणसाच्या मनाचा कमकुवतपणा कमी व्हायची गरज आहे. एकदा का अंधश्रद्धांची गरज नाही असं वाटायला लागलं की, त्या

नाहीशा व्हायला वेळ लागणार नाही. हेच बघा ना, एखादी बस चुकली की, ती आपल्या नशिबात नव्हती म्हणून आपण काही नशिबाला बोल लावत नाही. कारण दुसरी बस थोड्या वेळानं येणार असते. तसंच आपल्या मनाला कळलं की, 'एखादी संधी गेली तरी दुसरी मिळणारच.' तेव्हाच या अंधश्रद्धा नाहीशा होतील. अशा संधी मिळण्यासाठी समाजातून बेकारी, गरिबी कमी व्हायला हवी. समान नागरी कायदा आणि शास्त्रीय व्यवस्थापन निर्माण करायला हवं; तरच प्रत्येकाच्या मनात आत्मविश्वासाची ज्योत पेटेल. मगच तो प्रयत्न आणि चिकाटी यांची कास धरेल. सध्या झालंय काय, एका बाजूनं आपण विज्ञानाचं तंत्र स्वीकातोय आणि दुसऱ्या बाजूनं अंधश्रद्धा आणि रूढी-परंपरांना खतपाणी घालतोय."

"बरं, चहा घेणार का?" पाहुण्यांनी विचारलं.

"चालेल, थोडा थोडा."

पाहुणे चहा सांगायला आत गेले आणि लगेच बाहेर आले.

"मला वाटतं, कार्यक्रम ९.३० चा असला तरी तो आपण दहाला सुरू करू या."

"का? सगळी तयारी तर झालीय. तुम्हाला कुठे जायचंय?" विशालनं विचारलं.

"नाही. म्हटलं, आज सूर्यग्रहण आहे नं? ग्रहणकालात कार्यक्रम सुरू करणं म्हणजे......"

"त्यात काय झालं? सूर्यग्रहण हा तर निसर्गाचा प्रेक्षणीय आविष्कार आहे. याचा आपल्या कार्यक्रमाशी काय संबंध?" काका म्हणाले.

"नाही, माझा तसा या भाकडकथांवर विश्वास नाही. पण तरीही जरा उशिरा सुरू केला कार्यक्रम तर काय हरकत आहे? उगाच विषाची परीक्षा कशाला घ्या ! कदाचित तुमच्या हेडमास्तरांच्या लक्षात ग्रहणाचं आलं नसेल."

"कसलं काय घेऊन बसला साहेब! तुम्हाला मी सांगतो," असं म्हणत काकांनी त्यांचा अनुभव सांगायला सुरवात केली. "१६ फेब्रुवारी १९८० साली जे कंकणाकृती सूर्यग्रहण झालं होतं ना, त्या वेळी मी आणि आमच्या विज्ञान संघटनेच्या कार्यकर्त्यांनी ग्रहण पाहण्याचा एक मोठा कार्यक्रम केला होता. त्या वेळी ग्रहण पाहण्यासाठी आम्ही गॉगल्सही बनविले होते. अनेकांना ते ग्रहण पाहायला उद्युक्त केलं. एवढंच नव्हे तर त्या वस्तीतील गर्भार स्त्रियांनीही ते ग्रहण पाहिलं, आम्ही सर्व जण खात होतो, फळं कापत होतो. तरीही विपरीत घडलं नाही. शासन मात्र लोकांनी ग्रहण पाहू नये, हालचाल करू नये म्हणून दूरदर्शनवर 'गुड्डी' चित्रपट दाखवून लोकांमध्ये अंधश्रद्धेचा पगडा वाढवण्याचं सत्कार्य करत होतं."



"हो, आजही रेडियोवरून सांगितलंय की, सूर्यग्रहण पाहू नका म्हणून !"

"हो?"

"ते तर योग्यच आहे. ग्रहणात सूर्यावर जरी चंद्राची सावली पडून प्रकाशकिरण आणि प्रखरता कमी झाली असं वाटलं तरी काही प्रमाणात ते येतच असतात. त्यामुळे त्यांचा परिणाम आपल्या डोळ्यातील दृष्टिपटलावर होऊन तो जळण्याची शक्यता असते आणि आपण आंधळे होऊ शकतो. म्हणून गॉगल्सच्या काचा, वाया गेलेली क्ष किरणाची फिल्म वा आरशाच्या कवडशांतून किंवा काचेवर काजळी करून तीतून ग्रहण पाहायचे असते."

"अहो, आपल्या वेदांतही सांगितलंय, ग्रहणकालात काय काय करावं ते. त्या वेळच्या वातावरणाचा माणसावर परिणाम होतो म्हणून ग्रहण सुटल्यावर आंघोळही करावी."

"ते ठिकाय हो. तुम्हाला गंमत सांगतो. त्या ग्रहणाच्या वेळी ज्या गर्भार स्त्रियांनी ग्रहण पाहिलं, फळं कापली, त्यांपैकी एकीलाही व्यंगात्मक मूल झालं नाही आणि आंघोळ करणे म्हणजे एका आपत्तीतून सुटलो या भ्रामक समजुतीतून मुक्त होणे. आता आपल्याला कळलंय, ही आपत्ती नसून नियमितपणे घडणारी, नवीन संशोधनाला सहाय्यभूत होणारी घटना आहे. खरं तर आता आपण या अंधश्रद्धांच्याच नावानं आंघोळ केली पाहिजे."

"चला, निघू या नं?" विशालनं घड्याळाकडे बघत विचारलं.

"चला. माझीही तयारी झालीच आहे."

विशाल, काका आणि पाहुणे ठीक ९.२५ वाजता शाळेत पोहोचले, हेडमास्तरांनी त्यांचे हसत स्वागत केले आणि कार्यक्रमाच्या हॉलकडे चलण्याची विनंती केली. कार्यक्रम सुरू करण्यापूर्वी पाहुण्यांशी शिक्षकांच्या ओळखी करून दिल्या. थोडं बोलणं झालं. तोपर्यंत पावणेदहा वाजले होते. कार्यक्रमाला लगेच सुरवात करण्यात आली.

विशाल स्टेजवर स्वागत आणि प्रास्ताविक करण्यासाठी उभा राहिला. पाहुण्यांचं स्वागत करून त्यांना पुष्पगुच्छ देण्यासाठी मागे वळला तो त्याचा तोल गेला आणि स्टेजवरून धापकन् खालीच पडला. धावपळ झाली. काकांनी विशालला उचलला. पाहातात तो काय त्याचा हातच मोडला होता. तावडतोब त्याला दवाखान्यात नेण्यात आलं. पण विशालनं जाताना सरांना विनंती केली की, "कार्यक्रम थांबवू नका. तो व्यवस्थितपणे होऊ दे."

जिना उतरताना पाहुणे काकांना म्हणाले, "पाहा, मी म्हटलं होतं नं, ग्रहणकालात काही करू नये म्हणून ! नाहीतर काहीतरी असं घडतंच."

"काय, म्हणताय राव ! ग्रहण तर संपून १५ मिनिटे झालीयत. ग्रहण ९.४० ला संपले आणि कार्यक्रम पावणेदहानंतर सुरू झाला. ग्रहणाचा काय संबंध? घडणाऱ्या गोष्टी अशा तकलादू विचारांनी आणि उपायांनी थोड्याच टाळता येतात?" काका तीव्रतेने म्हणाले. त्यांच्या चेहऱ्यावर पाहुण्यांची कीव करणारा भाव होता.



# राशींच्या करामती

"काका, ज्योतिष हे शास्त्र नाही हे पटलं मला. पण त्यात राशिचक्र, ग्रहण, ग्रहतारे यांचा विचार केलेला असतो म्हणून त्यात काहीच तथ्य नसेल असं कसं म्हणावं?"

"विशाल बाळा, हीच तर गंमत आहे. आपल्याला बऱ्याचशा गोष्टी पटतात पण त्यांचं आकलन मात्र करणं कठीण जातं. ह्याचं कारण लहानपणापासून आपल्यावर झालेले संस्कार. हे ज्योतिषी खगोलशास्त्राची आणि गणिताची बेमालूमपणे सरमिसळ करून तुम्हाला तुमचं भविष्य सांगतात तेव्हा त्यातील अतार्किकता काही तुमच्या लक्षातच येत नाही. आता मागच्या वेळेस तुला मी ग्रहांच्या वक्री आणि मार्गी होण्यासंबंधीची शास्त्रीय माहिती दिली. त्याचा कुठेतरी आपल्या जीवनाशी वा भविष्याशी संबंध पोहोचतो काय?"

"नाही."

"नाही ना? तसंच हे राशिचक्राचं आहे. म्हणजे असं बघ की, आपल्या भूतलावरून आपल्याला जी सत्तावीस नक्षत्रं दिसतात त्यांच्या आकारावरून आपण त्यांना बारा राशींत विभागलं. त्यातील काहींचा आकार विंचवासारखा दिसतो, काहींचा बैलासारखा तर काहींचा हरणासारखा नाहीतर सिंहासारखा. या काल्पनिक आकारावरून वृश्चिक, मेष, सिंह अशी या राशींना नावं दिली गेली. या राशींच्या पार्श्वभूमीवरून सूर्य, चंद्र व इतर ग्रह यांचा भासमान मार्ग जातो, म्हणून त्या त्या वेळी ते त्या राशीत आहेत असं म्हणतात. सूर्याच्या बाबतीत म्हणशील तर साधारणपणे एकेक महिना सूर्याचा मुक्काम एकेका राशीत असतो."

"म्हणजे नेमकं काय?"

"म्हणजे असं की, सूर्योदय त्या राशीतून होतो. तसंच ग्रहांच्या बाबतीतही सांगता येईल. आता ज्योतिषी काय करतात. तर या खगोलीय घटनांना स्वभाव चिकटवतात. ते असं म्हणतात की, यातील काही राशी चर, काही स्थिर काही द्विस्वभावाच्या आहेत. मेष, सिंह आणि धनू या राशी अग्नि तत्त्वाच्या आहेत. मिथुन, सिंह आणि कन्या यांना वंध्य ठरवलं आहे. यामागे ना कोणतं शात्रीय तत्त्व ना गणिती सूत्र. खरं तर कन्या रास ही बहुप्रसवा असावयाला हवी ! पण मिथुन आणि मीन यांना मात्र जुळ्या राशी म्हणतात. हे सगळे स्वभावाचे निकष कोणत्या आधारावर लावलेयत ते तेच जाणोत. त्यामागे विज्ञान मात्र खचितच नाही."

"छ्याऽऽ हे फारच कटकटीचं केलंय की त्यांनी."

"बरोबर आहे. तुम्हाला हे जोपर्यंत अगम्य आणि क्लिष्ट वाटेल तोपर्यंत त्यांची पोळी पिकणार आहे, हे तू विसरू नकोस. आता गंमत बघ हं, ह्या राशी ग्रहांनासुद्धा उच्च ठरवतात."

"ही काय आणखी भानगड?"

"ज्योतिषशास्त्र हे अशाच भानगडींनी भरलंय. काय म्हणे तर रवि म्हणजे सूर्य बरं का सिंहाचा स्वामी आहेच, पण तो मेषेतील दहाव्या अंशात अत्यंत उच्चीचा आणि तुळेच्या दहाव्या अंशात मात्र अति नीच. ज्या सूर्यावर संपूर्ण सूर्यमाला अवलंबून आहे, पृथ्वीवरील जीवन आहे त्याची ही कथा, तर तुम्हा आम्हा पामरांची हे ज्योतिषी काय वाट लावतील हे सांगायला नकोच. याचा अर्थ ग्रहांच्या पार्श्वभागी असलेली रास त्याचं सबलत्व काढून त्यास निर्बल बनवू शकते. मग त्यांच्याच म्हणण्यानुसार ग्रहांपेक्षा राशीच जास्त परिणामकारक ठरायला हव्यात. पण ते तर ग्रहांचे परिणामच जास्त महत्त्वाचे मानतात. आहे की नाही मजेशीर विरोधाभास आणि विसंगती. तरीही तू म्हणतोस की ज्योतिषात काही तथ्य आहे म्हणून."

"आता मात्र हे सारं थोतांडच वाटायला लागलंय हं. कुठलं तर्कशास्त्र आहे हेच कळेनासं झालंय."

"ह्या ज्योतिषांची आणखीही एक गंमत आहे. ते नुसते राशींचे स्वभाव सांगून थांबले नाहीत तर गणितासारखे गुण आणि जातीही त्यांना चिकटवल्यायत."

"माणसात जसे सत्त्व, रज आणि तम हे गुण आहेत तसं त्यांनी बुध आणि शुक्रला राजस, सूर्य, चंद्र आणि गुरूला सात्त्विक, आणि अन्य सर्व ग्रहांना तमोगुणी म्हणून ठरवून टाकलंय. आता हे सगळे कोणत्या गणितावर हे काही त्यांनाही सांगता येत नाही. एवढंच नव्हे तर चंद्र आणि शुक्र हे स्त्रीलिंगी, तर बुध आणि शनी यांना नपुंसक बनवून टाकलंय आपल्या ज्योतिषमार्तंडांनी. काय म्हणावं या कर्माला? कोणता तरी शाबूत डोक्याचा माणूस ह्यावर विश्वास तरी ठेवेल का?"

"काका, मी तर असं ऐकलंय की, ज्योतिषांनी देशाच्या आणि शहरांच्यासुद्धा राशी नक्की केलेल्या आहेत. त्यावरून त्यांचं भविष्यही वर्तवता येतं म्हणे."

"काय रे! आतापर्यंत तुला एवढं सांगितलं तरीही तुला अशी शंका यावी नौ. हे असंच असतं बघ आपलं. अनेक गोष्टी कळूनसुद्धा आपल्या डोक्यावरचा जुनाट पगडा उतरवायला तयार नसतो आपण. ठीक आहे. आता आपण भारताचं आपल्याच देशाचं उदाहरण घेऊ. ज्योतिषमार्तंडांनी भारताची रास कन्या ठेवली आहे. आता भारत देश ज्या कोणत्या क्षणी जन्माला आला त्या वेळी कन्या राशीत चंद्र होता काय? आणखी एक गंमत बघ हं. भारताची जन्मवेळ नेमकी



कोणती? स्वातंत्र्य मिळाल्यानंतरचा भारत? ब्रिटिशांनी भारतावर अंमल सुरू केला तो? सम्राट अशोकाच्या काळचा भारत? की पृथ्वीवरील उत्क्रांतीच्या ओघात भारतीयांच्या अस्मिता जागृत झाल्यानंतरचा भारत? बरं, आज पृथ्वीवर शंभराच्यावर देश आहेत. त्या सगळ्यांची प्रत्येकी रास कोणती? दुसरं असं की, भारत आणि पाकिस्तान यांची जन्मवेळ एकच असं म्हटलं तर मग पाकिस्तानची रास कोणती? खरं तर राष्ट्राचं भविष्य त्या त्या राष्ट्रातील नागरिकांच्या अविरत कष्टानं आणि परिश्रमानं ठरत असतं हे गेल्या तीस/चाळीस वर्षांत जपाननं सिद्ध करून दाखवलंय. राखेतून उठणाऱ्या फिनिक्स पक्ष्यासारखा जपान आज संपूर्ण भूतलावर अग्रगणी आहे ते काय फलज्योतिषावर विसंबून? एवढंच काय चहूबाजूंनी हल्ले होऊनसुद्धा इस्रायलने वाळवंटात नंदनवन फुलवलंय तेही का या फलज्योतिष्यावरच? नाही ना? मग आपण तरी का या ज्योतिषाच्या मागे लागावं? शास्त्रज्ञांनीही या ज्योतिषशास्त्राला वैज्ञानिक निकष लावायचे प्रयत्न केले आहेत. पण त्यांनाही कुठे या शास्त्राला वैज्ञानिक पाया असलेला आढळलेला नाही. डॉ. अब्राहम कोवूरपासून आजच्या अंधश्रद्धा निर्मूलन चळवळीपर्यंत गेले २० वर्षांपासून 'ज्योतिषशास्त्र हे शास्त्र आहे' हे सिद्ध करण्याचं एक लाख रुपयांचं आव्हान दिलेलं आहे आणि आजतागायत ते कोणत्याही ज्योतिषमार्तंडानं स्वीकारलेलं नाही. यावरूनच काय ते समज. तात्पर्य काय तर ज्योतिष हे मानव मन दुर्बल करणारं, त्याच्या चांगल्या आयुष्याचं खोबरं करणारं, पोटभरू लोकांनी निर्माण केलेलं एक थोतांड आहे हेच खरं."

# बुवा लोक नेमकं करतात तरी काय?

"अरे विशाल, माझ्या त्या अँटीअॅसीडच्या गोळ्या घेऊन ये बरं. आज माझी अॅसिडीटी वाढलीय. जरा एकसारखी घशात जळजळ होतेय." काकांनी विशालला हाक मारून घरातून गोळ्या आणण्याविषयी फर्मावलं. विशाल आतल्या खोलीत गोष्टीचं पुस्तक वाचण्यात दंग झाला होता. त्याला काकांची हाक ऐकूच गेली नाही. थोडा वेळ वाट पाहून काकांनी पुन्हा एकदा जोरानं हाक मारली. विशालनं दचकून मान वर केली आणि 'आलो हं' म्हणत काकांकडे गेला.

"काय आहे?" शांतपणे त्याने विचारलं.

"काय करत होतास? मी मघापासून हाका मारतोय, जीव जायची पाळी आलीय. एवढी जळजळ होतेय. बरं ठीक आहे. जा त्या अँटीअॅसीडच्या गोळ्या घेऊन ये. फ्रीजमध्ये ठेवल्यायत बघ."

"काका, या गोळ्यांनी जळजळ कशी काय थांबते हो?" काकांच्या हातावर गोळ्या ठेवत विशालनं विचारलं.

"अॅसिडीटी वाढते म्हणजे शरीरात आम्ल मोठ्या प्रमाणात तयार होतं. खरं तर आम्लनिर्मिती ही पचनास आवश्यकच असते. पण जेव्हा या आम्लाचं प्रमाण आवश्यकतेपेक्षा जास्त होतं तेव्हा ही जळजळ सुरू होते. कारण हे आम्ल तीव्र असतं. ते शरीरातील पेशींना हानिकारक असतं. अर्थात शरीरातून ताबडतोब या वाढलेल्या आम्लाचा प्रभाव कमी व्हावा म्हणून प्रतिक्रिया केली जाते. एक म्हणजे तोंडात लाळेच प्रमाण वाढतं. ती आम्लात विरघळून त्याला सौम्य करण्याचा प्रयत्न केला जातो. दुसरं म्हणजे तहान लागते. मग भरपूर पाणी पिऊन आम्ल सौम्य केलं जातं. पण तरीही आम्लता कमी झाली नाही तर मग या अँटीअॅसीडच्या गोळ्या घेऊन पोटातल्या पोटात उदासीनीकरणाची क्रिया केली जाते."

"उदासीनीकरण ! म्हणजे आम्ही शाळेत शिकतो ते? आम्ल आणि अल्क यांच्यापासून क्षार व पाणी तयार होण्याची क्रिया. याचा अर्थ काका," विशाल विचार करत म्हणाला, "पोटातील आम्लावर या अँटीअॅसीडच्या गोळ्यांतील अल्काची क्रिया होते आणि क्षार व पाणी तयार होतात, असंच ना?"

"बरोबर, या अँटीअॅसीडच्या गोळीत अॅल्युमिनीयम हैड्रॉक्साईड, मॅग्नेशियम हैड्रॉक्साईड अशी सौम्य अल्कली असतात. या अल्काची पोटातील जास्त प्रमाणात तयार झालेल्या हैड्रोक्लोरिक आम्लावर क्रिया होते. त्यापासून क्षार व पाणी तयार होतात आणि जळजळ थांबते."

"या अॅसिडीटीलाच आपण आम्लपित्त म्हणतो ना काका. पण मुळात पोटात या आम्लाचं प्रमाण वाढतंच का?"

"सध्याच्या धावपळीच्या जगात वेळेवर न जेवणं, जागरणं करणं, मानसिक तणावाखाली वावरणं, अती श्रम करणं, अशा अनेक अवस्थांतून माणूस जगत असतो. परिस्थितीचाच रेटा एवढा जबरदस्त असतो की हे कळत नकळत घडतच राहतं. दुसरं कारण म्हणजे प्रदूषित हवा."

"पण वेळेवर न जेवणं, जागरण किंवा मानसिक ताण यांचा परिणाम पोटातील आम्ल वाढण्यात कसा काय होतो?"

"आपल्या शरीराला ठराविक काळात भूक लागते. अशा वेळी शरीरातील पचनसंस्थेच्या अवयवांतून वेगवेगळे पाचक रस तयार होऊ लागतात व ते स्रवू लागतात. अशा वेळेस जर अन्न पोटात गेले नाही तर ते लहान आतड्याच्या पेशींवर चाल करून जातात. परिणामी आम्लपित्त वाढते. जागरण किंवा मानसिक ताण यामुळेही या रसांची मोठ्या प्रमाणात निर्मिती होते. तिखट पदार्थ सातत्याने खाल्ल्यावरही आम्लपित्त वाढते. म्हणून दिवसांतून चार वेळा थोडं थोडं खाणं हा सर्वात उत्तम उपाय. पण मुंबईच्या या धावपळीच्या आणि धकाधकीच्या जीवनात एवढी फुरसत आहे कुणाला? चार घास कसेबसे पोटात ढकलतात आणि लागतात कामाला."

"या अँटीअॅसिडच्या गोळ्यांमुळं पोटातल्या पोटात उदासीनीकरण होतं म्हणता, पण झालंय की नाही हे कसं कळणार?"

"सोपय् करपट ढेकर येणे थांबलं, जळजळ थांबली, झालंच तर लाळेचं प्रमाण कमी झालेलं कळतं. या सगळ्या खाणाखुणा आम्लपित्त कमी झाल्याच्याच असतात."

"पण मग पोटात अँटीअॅसीडच्या गोळ्यातील अल्काचं प्रमाण वाढलं तर काही त्रास नाही होत?"

"थोडासा होतो. तोंड सुकतं किंवा पोटात कधी कधी गॅस वाढतो. पण हे तात्पुरतं असतं. थोड्या वेळानं आणखी तयार झालेल्या आम्लाबरोबर अल्क क्रिया करतं आणि उदासीनीकरण पूर्ण होतं."

"आम्ही प्रयोगशाळेत हा उदासीनीकरणाचा प्रयोग करताना दर्शक वापरतो. त्यामुळे नेमका रंगबदल ज्या बिंदूवर होतो, तिथे उदासीनीकरण पूर्ण झाल्याचं कळतं. तशी काही इथं सोय नाही."

"सांग बघू कोणते दर्शक वापरता ते?"

"सांगू? फिनॉलथॅलीन, मेथील ऑरेंज, लिटमस पेपर."

"आणखी एक आहे माहीत आहे?"

"अंऽ नाही बुवा."

"हा दर्शक तर घरातसुद्धा – अगदी आपल्या स्वयंपाकघरातला आहे. ओळख पाहू."

"..........."

"नाही ना ओळखता येत. तुम्हा आजकालच्या मुलांना पुस्तकापलिकडचं काहीच कसं रे माहीत नसतं. अरे याच दर्शकाचा उपयोग करून खेडेगावातून बुवा लोक बाहेरच्या बाधेचं-भूत लागल्याचं निदान करून लोकांना बनवत असतात."

"ते कसं काय बुवा?"

"त्या दर्शकाचं नाव आहे 'हळद'. जसा आम्लात निळा लिटमस तांबडा आणि अल्कात तांबडा लिटमस निळा होऊन रंगबदल दाखवतो. मेथील ऑरेंज अल्कात पिवळा तर आम्लात गुलाबी रंग बदल करतो. फिनॉलथॅलीन आम्लात रंगहीन तर अल्कात गुलाबी रंग आणतो. तसंच हळदही अल्कलीत मिसळली असता गडद लालभडक रंगपिंजरच म्हणा ना तयार करते. म्हणूनच तर हळदीला दर्शक म्हणायचं."

"मग बुवा लोक नेमकं काय करतात?" विशालनं उत्सुकतेनं विचारलं.

"ज्याच्या अंगात भूत आलंय त्याच्या तळहातावर हळद चोळतात. मग मंतरलेलं पाणी म्हणून त्याच्या हातावरून, पानाला आपण जो चुना लावतो ना, त्या चुन्याचं पाणी सोडतात आणि त्याला हात धुवायला लावतात. चुना हा अल्कली आहे. कॅल्शियम हैड्रॉक्साईड. हळद त्या पाण्यात मिसळली की रंगबदल होणारच असतो. त्याप्रमाणे त्याच्या हातातून लालभडक रक्ताळलेलं पाणी बाहेर पडतं आणि लोकांना वाटतं बुवाला मंत्रसिद्धी आहे अन् तो भूत उतरवतो. आहे की नाही खुळं मन लोकांचं!"

"हा तर सरासर विज्ञानाचा दुरुपयोगच झाला की."

"म्हणूनच तर मी तुला सारखं म्हणत असतो, विज्ञान फक्त पुस्तकात नाही, ते जीवनात आहे. पुस्तकं सैद्धांतिक पाया पक्का करण्यासाठी असतात. त्या आधारे जीवनात डोळसपणे पाहायला शिकायचं असतं. नाहीतर साधे रासायनिक प्रयोगही दैवी शक्तीचे चमत्कार वाटतात."



# काकांनी चक्क पेटता कापूर गिळला !

"काका, शेजारच्या काकूंच्या किनई आज देवी अंगात आली होती. केस मोकळे सोडून त्या अशा घुमत होत्या म्हणता ! मला तर क्षणभर भीतीच वाटली. सगळे जमलेले त्यांच्या पाया पडत होते. आईनेही नमस्कार केला आणि मीही. अंगात आल्यावर त्या 'आग आग' असं ओरडू लागल्या. त्याबरोबर त्यांच्या मुलीनं त्यांच्या तळहातावर जळता कापूर ठेवला. तो त्या या हातावरून त्या हातावर सहज खेळवत होत्या. तरी त्यांच्या हाताला चटका बसला नाही. अन् पाहता पाहता त्यांनी तो सरळ जीभेवरच ठेवला. तरीही जीभ भाजलीच नाही. दैवी शक्ती संचारली होती ना त्यांच्या अंगात!"

काकांनी विशालचं म्हणणं शांतपणे ऐकून घेतलं आणि म्हणाले, "जा घरातून कापूरवडी घेऊन ये बघू."

विशाल धावतच देवघरात गेला. डबीतील कापूरवडी काढली आणि काकांकडं आला.

"अरे काडेपेटीही नाही का आणायची सोबत."

"विशाल पुन्हा धावत स्वयंपाकघरात जाऊन काडेपेटी घेऊन आला. काकांनी त्याला काडी घासून पेटवायला सांगितली. ती पेटल्यावर त्यांनी कापूरवडी जाळली अन् हातावर खेळायला लागले. अंगात आलेल्या काकूंच्या सारखंच अंगात कोणताही देव/देवी न येता काका जळता कापूर कसा खेळवतात याचं विशालला आश्चर्य वाटलं.

त्याच्याकडे पाहत काका म्हणाले, "हे पाहा, आता मी जळती कापूरवडी तोंडात पकडतो हं."

असं म्हणतच त्यांनी कापूरवडी तोंडात टाकली. तोंडात कापूरवडी जळत होती. पण काकांना कसलीही इजा झाली नाही.

"म्हणजे काका, ही दैवी शक्ती नाही?" विशाल अविश्वासानं म्हणाला.

"अंगात येणं, बाहेरची बाधा होणं यात कुठलीही दैवी वा सैतानी शक्ती नसते. ही सगळी माणसं खरं तर मनोरुग्ण असतात. त्यांना मानसिक आधाराची गरज असते. तो आधार त्यांना आपणच देवी अंगात येण्याची अंधश्रद्धा जोपासून देत असतो. याची खरी कारणं आपल्या सामाजिक स्थितीत गुंतलेली आहेत. सर्वच चमत्कार हे विज्ञानाचा आधार घेऊन वा हातचलाखीचा वापर करून केले जातात. त्यात कुठलीही दैवीसिद्धी नसते."

"ते कसं काय?"

"हे बघ, आता हा आग खाण्याचाच प्रयोग बघू या. जळत्या कापूरवडीने भाजत नाही. याचं कारण ती भराभर या हातावरून त्या हातावर नेली जाते. जीवशास्त्रीय नियमानुसार आपल्याला होणारी कोणतीही संवेदना मेंदूपर्यंत पोहोचून तिचा अर्थ लावण्याचा कालावधी अडीच ते तीन सेकंदाचा असतो. त्याच्या आत जर एखादी घटना घडली तर मेंदूपर्यंत ती संवेदना पोहोचतच नाही. मग तिचा अर्थ लावणं राहिलं दूरच. आता सांग भाजलंच कसं? तू पण करून बघ."

काकांनी लगेच त्याच्या हातावर जळता कापूर ठेवून त्याला खेळवायला सांगितले. विशाल तसं करू लागला. त्याची भीती आता चेपली होती. त्यानं ती जळती वडी चिमटीत उचलली. आणि सरळ जिभेवर ठेवून दिली. त्याला काहीही झालं नाही.

"ते बुवा लोक जळत्या निखाऱ्यावरून चालताना याच तत्त्वाचा वापर करीत असतील, नाही का?"

"बरोबर बोललास."

"पण ते निखाऱ्यावरील राख का उडवतात सारखी? आणि मीठ का टाकतात?"

"साधंय. राख उडविल्यानं निखारा फुलतो आणि पायाला चिकटत नाही. उष्ण राख मात्र पायाला चिकटते. चटका बसतो तो राखेचा – निखाऱ्याचा नाही. आता मीठ ओवाळण्याच्या बाबतीत म्हणशील तर फुललेल्या निखाऱ्यावर मीठ पडल्यानंतर ते निखाऱ्यातील काही उष्णता शोषून घेऊन वितळते. त्यामुळे निखाऱ्याच्या पृष्ठभागावरील तापमान काही अंशी कमी होते. मग निखाऱ्यावरून अडीच ते तीन सेकंदाचं भान ठेवून चालणं सोपं जातं."

"काही भगत उकळत्या तेलाच्या कढईत हात घालून तळलेले वडे काढतात. त्यांच्या अंगातही दैवी शक्ती असण्याचं कारण नाही मग."

"हो नं. तेही याच तत्त्वाचा वापर करतात." काका म्हणाले, "उकळत्या तेलावरील वाफ फुंकरीनं बाजूला सारायची आणि पटकन हात बुडवून वडे काढायचे. कारण वाफेचा चटका हा जास्त वाहक असतो. एक ग्रॅम वाफेचं पाण्यात रूपांतर होताना ती ५४० कॅलरीज एवढी प्रचंड उष्णता बाहेर सोडते. म्हणूनच तर उकळत्या पाण्यापेक्षा वाफेचा फटका जास्त तीव्र असतो. याच कारणास्तव ते वाफ बाजूला सारतात. दुसरं असं की, चटका बसू नये म्हणून ते तथाकथित मंतरलेल्या पाण्यात हात कडवून चोळतात आणि ते ओले हात उकळत्या तेलात बुडवतात. तेलाच्या पृष्ठभागावरील तापमान कमी व्हावं म्हणून कधी कधी ते लिंबूही पिळतात. आपल्या धार्मिक कर्मकांडात मीठ ओवाळणे, लिंबू

काकांनी चक्क पेटता कापूर गिळला !



कापणे/पिळणे, मंतरलेलं पाणी, नारळ यांना पवित्र अर्थ असतो ना, त्याचाच हे लोक फायदा घेत असतात. आपल्या विचार न करण्याच्या आणि भाकडकथांवर, पुराणं आणि पोथ्यांवर असणाऱ्या श्रद्धेचा गैरफायदा घेतात हे लोक. खरं तर ही श्रद्धा नसतेच मुळी. तीच असते अंधश्रद्धा."

"पण मग एवढे शिकले-सवरलेले लोकही कसे काय यावर विश्वास ठेवतात काका?"

"माणूस शिकला तरी त्याला विचार करायची अक्कल येतेच असं नाही. प्रत्येकाला सुखाचा शॉर्टकट हवा असतो."

"खरंच का हो, हे बाबा आपली दुःख दूर करू शकतात?"

"तसं असतं तर आज सगळ्या जगात, भारतात बाबा लोकांची संख्या सर्वात जास्त असूनही, आपल्या देशात गरिबी का? अनेक प्रश्नांचे गुंते का? सारखा दुष्काळ का पडतोय? त्यांच्या दैवी सिद्धीमुळे सगळी जनता सुखात लोळायला हवी होती. त्यांच्यामुळे फक्त मूठभरांचाच फायदा होतो की, जे बाबांची चांगली बडदास्त ठेवू शकतात."

"म्हणजे काका, हे सगळे साधू चक्क भोंदूगिरी करतात म्हणायचं. विज्ञानाचा दुरुपयोग करून चक्क चमत्कार म्हणून हे प्रयोग खपवतात. यावर काहीतरी इलाज शोधून काढला पाहिजे."

"तुला समर्थ रामदासांचा श्लोक माहीत आहे का? सामर्थ्य आहे चळवळीचं...."

# तिच्या डोळ्यांतून खडे पडू लागले !

"काका, आमच्या शाळेतील एका मुलीकडं भानामती झालेय. तिच्या डोळ्यांतून सतत खडे येत असतात. आमच्या वर्गातही आम्ही पाहिलं ते. एवढंच नव्हे तर आमच्या शिक्षकांनी आणि हेडसरांनीही पाहिलं. असे एकामागून एक वाळूचे लहान लहान खडे येत होते." विशालनं घरात पाऊन ठेवल्या ठेवल्या काकांना बातमी सांगितली.

"विशाल, अरे तुला किती वेळा सांगितलं की, भानामती, बाहेरची बाधा, भूतपिशाच्च या सगळ्या सांगोवांगीच्या गोष्टी आहेत म्हणून. या सगळ्या घटनांमागे असतो तो फक्त माणसाचाच हात. हे सगळे मनोरुग्ण असतात."

"तुम्ही म्हणता ते पटतं हो, पण आमच्या डोळ्यांसमोर जर एखादी अशी विचित्र घटना घडत असेल तर आम्ही काय समजायचं? आमच्या शिक्षकांनीही सांगितलं, ही भानामती आहे म्हणून."

"हे बघ, वैज्ञानिक दृष्टिकोन असला ना म्हणजे असले विचार सुचत नाहीत. शिक्षकही शेवटी याच समाजाचे घटक आहेत. लहानपणापासून त्यांच्यावरही असेच अंधश्रद्धेचे संस्कार झालेयत."

"तसे तर तुमच्यावरही संस्कार झाले होते. मग तुम्ही का नाही विश्वास ठेवत?"

"शिक्षणानं माणसाला दृष्टिकोन मिळतो. त्यासाठी वाचन आणि मननाची गरज असते. रूढी, परंपरा यांतील योग्यअयोग्य गोष्टींचा ऊहापोह करावा लागतो. त्यातून त्याच्या गोष्टी सोडण्यासाठी रूढी आणि परंपरांचा पगडा टाकून द्यावा लागतो. त्यासाठी मग संघर्ष करावा लागला तरी बेहत्तर."

"पण मग माणसं अशा गोष्टींवर विश्वास का म्हणून ठेवतात?"

"माणसाचं मन हे चाकोरीतून जाणारं असतं. कारण त्या चाकोरीचा रस्ता त्याला माहीत. समजा ही चाकोरी सोडली तर नवीन वाट धरायला लागणार. ही वाट कशी आहे हे माहीत नसतं. मग त्या वाटेवरचे काटेकुटे बोचले तर? खड्ड्यात पडलो तर? कुठेही भरकटलो तर? अशा अनेक प्रश्नांमुळं त्याला नवीन वाट शोधायची भीती वाटते. या भीतीपोटीच त्याला चाकोरीतील मळलेली वाट आवडते. तो ती सोडायला तयार होत नाही. आणि दुसरा कुणी नवीन वाटेकडं वळायला लागला की, त्यालाही रूढी आणि परंपरांच्या अभिमानाची गाथा ऐकवून परावृत्त करण्याचा प्रयत्न करतो."

"पण या गोष्टी मुळात निर्माण झाल्या कशा?"

"हे बघ, पूर्वीच्या काळी निसर्गाची अगणित गूढं आपल्याला माहीत नव्हती. सूर्य, चंद्र, पृथ्वी, तारे, पाऊस इत्यादी काय आहेत हेही माहीत नव्हतं. पण आज आपल्याला वैज्ञानिक प्रगतीमुळं – की जी माणसाच्या जिज्ञासू वृत्तीचं फळ आहे, तिच्यामुळं या घटना कशा घडतात, ते कशाचे बनले आहेत हे कळलं आहे. चंद्रावर तर माणसानं पाऊलसुद्धा ठेवलंय. मग तरीही संकष्टी चतुर्थी करायची का? ग्रहणाबद्दलच्या अंधश्रद्धा परंपरेच्या नावाखाली जपून ठेवायच्या का? बालविवाह, सतीच्या प्रथा, तथाकथित देवांना प्रसन्न करून घेण्यासाठी नरबळी द्यायचे का? शिक्षित होऊन तेच टाकाऊ विचार पसरवायचे का?"

"तुमचं म्हणणं पटतंय हो, पण मग हे काही मोठ्या लोकांना कळत नसेल?"

"बरेचदा कळतं रे. पण चाकोरी सोडायची भीती वाटते त्यांना. बऱ्याच गोष्टींची उत्तरं सापडत नाहीत म्हणून त्यांना त्या अतर्क्य वाटतात. मग त्यामागे कोणत्या तरी अकल्पित शक्तीचा आधार आहे असं वाटायला लागतं. त्यातूनच भानामतीचा जन्म होतो. पेटते बोळे येऊन पडणे, अचानक कपडे फाटणे, डोळ्यांतून खडे बाहेर पडणे अशा सहजासहजी माणसाच्या हातून न होणाऱ्या घटना दिसायला लागल्या म्हणजे भानामती झाली असे तो समजायला लागतो. पिढ्यान् पिढ्या हा समज पक्का केला जातो. कारण त्यामागे काही माणसांचे हितसंबंध गुंतलेले असतात. त्यांना कष्ट न करता अंधश्रद्ध माणसांना सहजगत्या लुबाडून पैसे उकळता येतात. तर काही वेळेला भानामती प्रकारात ती व्यक्तीच स्वतः अशा घटना घडवून आणत असते."

"ते कसं काय? ती व्यक्ती स्वतःला असा त्रास का म्हणून करून घेईल? आता त्या मुलीच्या डोळ्यांतून खडे येताना तिला त्रास होत नसणार का? आपल्या डोळ्यांत जरासा कचरा गेला तर किती त्रास होतो आपल्याला. डोळ्यांतून पाणी येतं. डोळे लालभडक होतात. असं कोणी उगीच वेडेचाळे करील काय?"

"वरवर विचार करता तू म्हणतोस ते खरं वाटतं. सर्वसाधारण माणसं असं वागणार नाहीत हे तर खरंच. पण माणूस जेव्हा असा विचित्र वागू लागतो तेव्हा त्याच्या मागे काही तरी कारण असलं पाहिजे, असा विचार का नाही करत आपण? आता या मुलीचंच उदाहरण घेऊ या आपण. हिच्या घरी कोण कोण आहेत?"

"तिला आई-वडील नाहीत. ती तिच्या मामांकडे राहतेय."

"तिच्या घरी तिला वागणूक कशी मिळते हे माहीत नसेलच तुला. चारएक दिवस थांब. मी तिची सगळी चौकशी करतो आणि तुला सांगतो."

चार दिवसांनंतर काकांनी विशालला सांगितलं, "बघ, तुला मी सांगत नव्हतो तसंच घडलंय्."

"म्हणजे काय?" काहीच न कळून विशालनं विचारलं.

"अरे त्या डोळ्यांतून खडे काढणाऱ्या मुलीबद्दल रे."

"काय ती स्वतःच टाकत होती खडे डोळ्यांत!"

"तर काय रे."

"पण ती असं का करत होती?"

"मी चौकशी केल्यावर असं कळलं की, तिला तिचा मामी फार छळते. दिवसरात्र तिच्याकडून मरमरेस्तोवर काम करून घेते. आणि खायलाही पोटभर देत नाहीय. तिच्या जाचातून सुटका व्हावी म्हणून तिनं हा विचित्र मार्ग धरला. डोळ्यांच्या खालच्या पापणीत गुळगुळीत असे दोन-चार वाळूचे खडे ठेवण्याचा तिनं सराव केला. हे काम ती कुणाच्याही नकळत करायची आणि वेळ आली की, पापणी फडफडवून ती ठराविक वेळाच्या अंतराने एकेक खडा काढायला लागायची. भानामतीची आवई उठल्यानंतर सगळेच तिच्याकडं सहानुभूतीनं पाहू लागले. अगदी तिची मामीसुद्धा घाबरली होती. मग काय, तिला हवं तसं मिळायला लागल्यावर तिने हा प्रकार वरचेवर सुरू केला."

"पण हे तुम्हाला कळलं कसं?"

"मी तिला विश्वासात घेऊन एकटीशी बोललो. सुरुवातीला ती बधेच ना. पण लालूच दाखवून आणि बोलता बोलता शब्दात पकडून तिच्याकडनं सगळं काढून घेतलं. नंतर तिच्या मामांना भेटून सगळं सांगून मामीची वागणूक बदलण्याविषयी सांगितलं. आता तिनं भानामती बंद करण्याचं आश्वासन दिलंय आणि मामीनंही चांगलं वागण्याचं कबूल केलंय."



# सिद्ध पुरुषांच्या सिद्धीचे रहस्य !

"काका, काका, त्या पलिकडच्या मैदानावर एक साधू आलाय. हीऽऽ गर्दी जमलीय तिथे. मीही थोडा वेळ थांबलो होतो; काय आहे ते पहात. आणि बोलता बोलता त्यानं मंत्र पुटपुटून नारळातून अग्नी प्रज्वलित करून दाखवला की हो. भलताच मोठा सिद्धपुरुष दिसतोय तो. नुसत्या मंत्रानं अग्नी पेटवतो म्हणजे काय!" विशालनं घरात शिरल्या शिरल्याच काकांना आश्चर्यमिश्रित चेहऱ्यानं बातमी दिली.

"हे बघ, दैवी सिद्धी-बिद्धी काही नसते. हे चमत्काराचे खेळ म्हणजे जादूचेच प्रयोग असतात. मागच्याच वेळी नाही का तुला सांगितलं, आपल्या भोळ्या भाबड्या श्रद्धाळू मनाचा हे लोक गैरफायदा घेऊन विज्ञान आणि हातचलाखीने हे चमत्कार करतात म्हणून. तरीही तू म्हणतोस तो सिद्धपुरुष आहे म्हणून? तो भलताच आहे हे मात्र नक्की."

"अहो, पण, त्यानं आमच्यासमोर....."

"या विश्वात कोणतीही ऊर्जा नाश पावत नाही आणि निर्माणही करता येत नाही. तिचे सतत एका ऊर्जेतून दुसऱ्या ऊर्जेत रूपांतर होत असते. आणि अशा प्रकारे विश्वातील एकूण स्थितीक व गतीज ऊर्जा कायम असतात. हा ऊर्जा अक्षय्यतेचा नियम तुला माहीत आहे ना? आता अग्नी ही एक ऊर्जा आहे. ही ऊर्जा मंत्राने निर्माण होत नाही तर त्या नारळाच्या शेंडीत घातलेल्या रसायनामुळे होते."

"आमच्यासमोर तर त्यानी एका भक्ताकडून नारळ मागून घेतला. मग त्यात ते रसायन टाकणार तरी कसं? त्यांनी फक्त त्याची गंधपुष्पांनी पूजा केली. आणि मंत्र म्हटला बस्स. क्षणात अग्निदेवता निर्माण झाली की. हे सगळं आमच्या डोळ्यांसमोरच चाललं होतं. हातचलाखीला त्याला वाव तरी होता का?"

"जादूगार सुद्धा तुमच्या डोळ्यांसमोरच सगळे प्रयोग करतो. तेव्हा का नाही वाटत तुम्हाला तो सिद्धपुरुष? कारण तुमच्या मनाची तयारी झालेली असते की, तुम्ही जादूचे प्रयोग पाहाणार आहात म्हणून. हे मनाच कंडीशनिंगच तुम्हाला बनवत असतं. साधूलोक तुमच्या मनाला धर्माच्या, श्रद्धेच्या नावाखाली कंडीशन करतात. एकदा का तुमचं मन त्या भाराखाली गेलं की, तुम्ही तुमची बुद्धी, सारासार विवेकशक्ती सारी सारी त्या बुवा चरणावर गहाण टाकता. मग का नाही तो सिद्धपुरुष वाटणार?"

"मग तुम्हाला सांगता येईल त्या मंत्राग्नीमागचं कारण?"

"कोणतीही गोष्ट कारणाशिवाय घडत नाही हे तरी तुला मान्य आहे नं? फरक एवढाच असतो, कधी ते कारण सापडतं तर कधी सापडायला वेळ लागतो. कधी कधी तर आपल्या हयातीतही ते कारण आपल्याला सापडू शकत नाही. म्हणून का आपण त्यांना दैवी शक्ती म्हणायचं?"

"काका, माझ्या प्रश्नाचं उत्तर मला प्रतिप्रश्न करून टाळू नका हं. मला माहीत नाही म्हणूनच तर तुम्हाला विचारतोय."

"अरे, तेच सांगत होतो मी. आता तुझ्या त्या मंत्राग्नी प्रकरणात काय रासायनिक क्रिया घडल्या असतील ते बघ हं. साधूनं प्रथम काय केलं तर...."

"एका भक्ताकडून नारळ मागून घेतला." काकांचं वाक्य विशालनं घाईघाईनं पूर्ण केलं.

"मग त्यांनी त्याची गंधपुष्प लावून पूजा केली. खरं ना?"

"हो."

"तू जर त्याच्या अगदी जवळ असतास आणि नीट निरीक्षण केलं असतंस तर तुझ्या लक्षात आलं असतं की, त्या फुलातून पाणी शिंपडताना एक लहानसा पिवळ्या फॉस्फरसचा तुकडा नारळाच्या शेंडीत पडलाय."

"पण काका, पिवळा फॉस्फरस तर हवेत पेट घेतो ना? मग तो फुलात असेपर्यंत का पेटू शकला नाही?" विशालनं रास्त शंका विचारली.

"अरे हो, सबूर, सबूर. तेच तर सांगतोय. पिवळा फॉस्फरस पाण्याखाली ठेवतात हे तर तुला माहीत आहे. ते फुल पाण्यात बुचकळून काढलं होतं. म्हणजे ते ओलं होतं ना? त्या ओलाव्यामुळं फॉस्फरसनं फुलात पेट घेणं शक्यच नव्हतं. नंतर तो ओला फॉस्फरसचा तुकडा फुलातील पाणी शिंपडताना नारळाच्या शेंडीत पडला आणि तुझा साधूबुवा मंत्र म्हणायला लागला. तेवढ्या वेळात तो तुकडा सुकला आणि पेटला. नारळाच्या शेंडीतील तुसंही मग पेट घ्यायला लागली. आणि तथाकथित मंत्राग्नी पेटला. आहे की नाही रासायनिक कमाल?"

"पिवळा फॉस्फरस हाताळणं धोक्याचं आहे असं आपण म्हणतो. मग तो तुकडा फुलात टाकताना त्या साधूनं हातात घेतला असेल ना? तेव्हाच का नाही पेटला?"

"तुम्ही लोक फार वरवरचा विचार करता रे. परंतु तुम्हाला वाटतं की, तुम्ही वैज्ञानिक दृष्ट्या विचार करताहात. पिवळा फॉस्फरस त्यांनी हातात घेतला असेल तोही पाण्यातून काढूनच ना? मग तो सुकेपर्यंत जेवढा वेळ जाईल



तेवढ्यात तो हातातून ओल्या फुलात जातो. मग पेटेलच कसा? हे खरंय की, पिवळ्या फॉस्फरसचा ज्वलनांक ३० अंश सेल्सियस आहे. आणि आपल्या शरीराचं तापमान ३६.५ अंश सेल्सियस. म्हणजे शरीराच्या तापमानामुळे फॉस्फरस हातात पेट घेईल. पण ही क्रिया जर ओला फॉस्फरस घेतला तर ४४ अंश सेल्सियस तापमानाला घडते. त्यामुळे तो हाताळला तरी तापदायक ठरत नाही. आता नेहमीच्या वातावरणाचंच तापमान साधारणतः ३०/३१ अंश सेल्सियस असतच. मग तो तुकडा सुकला की पेटायला काय वेळ ! म्हणजे तुझ्या त्या साधूनं सगळ्यांना चमत्कार दाखवून 'मामा' बनवलं की."

"खरंच की हो काका. हे तर आम्ही दहावीत शिकलो. फॉस्फरसवर अख्खा धडा आहे नं आम्हाला." पटल्यासारखं विशाल म्हणाला.

"आणि तरीही तू फसलास. धावत मला सांगत आलास की, मैदानावर सिद्धपुरुष साधू आलाय म्हणून." काका त्याला खिजवत म्हणाले.

"जाऊ दे नं हो काका. चुकलो मी." विशाल अजीजीच्या स्वरात म्हणाला.

"असा मंत्राग्नी पेटवण्याची आणखी एक पद्धत आहे."

"कोणती? सांगा ना?" विशाल उत्सुकतेनं म्हणाला.

"होमकुंडात किंवा नारळाच्या शेंडीत अबीर आणि शेंदूर कालवून त्यावरून तुपाची आहुती द्यायची."

"अबीर म्हणजे तो काळा बुक्का आणि शेंदूर म्हणजे मारुतीच्या अंगावर असते ते?"

"अरे असं ते म्हणतात रेऽ. खरं तर अबीर म्हणून ते जे वापरतात ते असते पोटॅशियम परमँगनेट -अबिरासारखं दिसणारं. आणि शेंदूर म्हणून जे टाकतात ती असते अमोनियम डायक्रोमेटची पूड. त्यावर जी साजुक तुपाची आहुती घालतात ना ते असते ग्लिसरीन. ग्लिसरीनची पोटॅशियम परमँगनेटवर उष्मात्यागी अभिक्रिया होते. त्यामुळे प्रचंड उष्णता निर्माण होऊन नारळाची शेंडी आणि पोटॅशियम परमँगनेटही पेट घेते. अमोनियम डायक्रोमेट ऑक्सिडोकारक पदार्थ या अभिक्रियेत ऑक्सिजन पुरवण्याचं काम करते. म्हणून ही जळण्याची क्रिया जरा जास्त वेळ चालते. ग्लिसरीन ओतल्यावर उष्णता निर्माण होईपर्यंतच्या काही सेकंद मंत्र पुटपुटण्याचा हावभाव करायचा की झाला मंत्राग्नी तयार !"

"म्हणजे हे साधूलोक आपल्या अंधश्रद्धेचा फायदा घेऊन आपल्याला चांगलंच लुबाडतात आणि गंडवतातही. याच्यावर खरं तर समाजानं बहिष्कार टाकला पाहिजे."

"हं, आता कसं शहाण्यासारखं बोललास !"

# (उपसंहार)
# अंधश्रद्धा आणि विज्ञान

विज्ञान हा मानवी जीवनाचा एक अविभाज्य भाग आहे. ती एक जीवन जगण्याची पद्धती आहे. मानवाच्या प्रगतीचा इतिहास ह्याच वैज्ञानिकतेतून झाला आहे. का? कसा? कशासाठी? अशाच प्रश्नांच्या मालिकेतून मानवाची जडण घडण झाली आहे. मानवी जिज्ञासा आणि सर्जनशीलता यांतूनच आजचा मानव उत्क्रांतीच्या वेगळ्या टप्प्यावर पोहोचला आहे. म्हणजे असं की, यंत्रमानव तयार करून प्रतिमानवाची निर्मिती करण्याइतपत त्यानं यश मिळवलं आहे. पण —

हा पणच खरा धोकादायक आहे. एका बाजूला एवढी उत्तुंग भरारी मारणाऱ्या माणसाच्या समाजातील दुसरं चित्र काय दिसतं? वैज्ञानिकतेतून निर्माण झालेल्या तंत्रज्ञानाला तो सहज स्वीकारतो. कारण त्यामुळं मिळणाऱ्या सुविधा त्याला दिसत असतात. पण त्यामागील वैज्ञानिक दृष्टिकोन स्वीकारण्याचं मात्र तो टाळत असतो. किंबहुना वैज्ञानिक दृष्टिकोनाविषयी तो अनभिज्ञच राहतो. कारण विज्ञानाचं तत्वज्ञान पचवणं तंत्रज्ञानाइतकं सोपं नसतं. त्यामुळेच उच्च विद्याविभूषित व्यक्तीसुद्धा एका हातात इलेक्ट्रॉनिकचं घड्याळ तर दुसऱ्या हातात कुणा बुवा/बाबाचा मंतरलेला गंडा बांधलेले दिसतात. हा विरोधाभास दिसण्याचं कारण आपल्याला समाजाच्या मानसिकतेत डोकावयाला भाग पाडतो.

विज्ञानाच्या व्यवहारात ज्या काटेकोर, तर्कसुसंगत आणि वस्तुनिष्ठ पद्धतीनं विचारव्यवहार व्हायला हवा ती शास्त्रीय पद्धत माणसानं त्याच्या वैयक्तिक तसेच सामाजिक जीवनातही अंगीकारण्याची गरज आहे, हेच मुळी लक्षात घेतले जात नाही. म्हणूनच विज्ञानातील समस्या सोडवताना शास्त्रज्ञही देव, नशीब, मुहूर्त, गुरुभक्ती इत्यादी गोष्टींवर हवाला ठेवताना आढळतात. या दुभंगलेल्या व्यक्तिमत्त्वामुळेच अग्निबाणाचं प्रक्षेपण करताना दिसतात खरं तर अग्निबाणाची काटेकोर चाचणी आणि बांधणी याकडे पुनःपुन्हा लक्ष देऊन अचूकतेचा परामर्श घेणे आवश्यक आहे. (प्रगत देशात असे मुहूर्त पाहिल्याचे वा कर्मकांड केल्याचे ऐकिवात नाही. असे का? याचा कधीतरी आपण विचार केला आहे का?) अशा दुभंगलेल्या व्यक्तिमत्त्वाचे कारण तो ज्या सामाजात राहतो, वावरतो, त्याचे लहानपणापासून त्याच्यावर संस्कार झालेले असतात. विज्ञानाच्या अभ्यासाने तो ते संस्कार पुसण्याचा प्रयत्नही करत असतो. पण आत्मविश्वासाच्या कमतरतेमुळे असं परस्परविरोधी वर्तन घडताना दिसतं. त्यामुळे प्रख्यात शास्त्रज्ञही विद्यार्थ्यांना एका बाजूला 'ऊर्जा नष्टही होत नाही आणि निर्माणही करता येत नाही, तिचे सतत एका ऊर्जेतून दुसऱ्या ऊर्जेत रूपांतर होत असते.' असा ऊर्जेच्या अक्षयतेचा नियम सांगतात. तर दुसऱ्या बाजूला मात्र ते स्वतः या नियमाविरुद्ध सत्यसाईबाबाने रिकाम्या हातातून काढलेली विभूती भक्तिभावानं स्वीकारताना दिसतात.

माणसाला अनेक नैसर्गिक गूढांचं आकलन झालेलं नाही. निर्जीवात जीव कसा येतो ? या विश्वाचा निर्माता कोण ? मृत्यूनंतर काय ? या विश्वाला आदी आणि अंत आहे की नाही ? जन्मापूर्वी मी कुठे होतो ? अशी अनेक प्रश्नांची मालिका बहुतांश अनुत्तरित आहे. त्यामुळे त्याच्यापोटी निसर्गाविषयी जशी प्रीती असते तशीच किंबहुना त्यापेक्षा जास्तच भीती वाटत असते.

काही विशिष्ट प्रकारची अमिनो आम्ले ठराविक प्रमाणात विशिष्ट हवामान आणि दाब या परिस्थितीत संयोजित झाल्यावर जीवाची उत्पत्ती होऊ शकते असे भारतीय शास्त्रज्ञ डॉ. खोरानांनी प्रयोगशाळेत सिद्ध करून दाखवले. त्यासाठी त्यांना नोबेल पारितोषिकही मिळाले. तसंच माणूस काय किंवा कोणताही सजीव काय हा अनेक मूलद्रव्यांच्या अणुरेणूंनी संयोजित झाला आहे. मृत्यूनंतर त्याचे रूपांतर अणुरेणूच्या मूळ स्वरूपात विघटित होते. तर जन्माच्या वेळी अणुरेणूंची एकत्रित होण्याची क्रिया चालू होते. म्हणजे शेवटी हे अणुरेणू नेहमीच (जन्मापूर्वी, जन्मल्यानंतर आणि मृत्यूनंतरही) तेच रहातात. फक्त त्यांची प्रमाणं बदलतात एवढेच. त्यामुळे पूर्वजन्माच्या कल्पनेलाही फाटा द्यावा लागतो. आणखी पुढचा विचार केला तर असे आढळून येते की, विश्वातही सतत उत्पत्ती आणि लय यांचा क्रम चालू असतो. पण अणुरेणू मात्र तेच असतात. त्यांची फक्त रचनाच बदलते. आणि म्हणूनच माणूस हा निसर्गाचाच एक भाग आहे. तो निसर्गाच्या विकासक्रमात बनलेला आहे. त्याचे शरीर, इंद्रिये, जाणिवा हे सारे या विकासक्रमाचेच आविष्कार आहेत. म्हणूनच तो ते जाणून घेऊ शकतो. त्याचे ज्ञान करून घेऊ शकते.

प्राचीन काळातील इतिहासात डोकावताना असं आढळतं की, निसर्गातील अनेक घटनांचं (उदा. चंद्र काय आहे ? सूर्य काय आहे ? पाऊस कसा पडतो ? तारे म्हणजे काय ? इ.) मानवाला आकलन झालं नव्हतं. पण त्याला एवढं मात्र कळलं होतं की, या घटनाक्रमामुळंच आपलं जीवन आहे, तेव्हा त्यांच्या प्रती कृतज्ञ होणं आपलं कर्तव्य आहे. ह्या कृतज्ञतेपोटीच पूजाअर्चा सुरू झाल्या. आणि देवाधर्माच्या कल्पना त्यांच्याशी निगडित झाल्या. हळूहळू समाजातील विशिष्ट वर्गानं याचा फायदा घेऊन सामान्य जनांच्या मनात भीती निर्माण केली. ज्ञानाला बंदिस्त केलं. त्यातून शोषणप्रक्रियेत घट न होता वाढच झालेली दिसते. एवढा जबरदस्त अंधश्रद्धेचा पगडा या वर्गानं वर्षानुवर्षे समाजमनावर बिंबवला. म्हणूनच आजही चंद्रावर माणसानं पाऊल ठेवलं असलं तरी आपण संकष्टी चतुर्थी करतो. पाऊस पडण्यासाठी यज्ञ करतो. मंगळ आणि शनीसारख्या ग्रहांना हाताशी धरून कुणाच्या लग्नात तर कुणाच्या आयुष्यात साडेसाती आणतो.

विश्वातील कोणतीच गोष्ट स्थिर आणि अपरिवर्तनशील नसते. तिच्यात सतत बदल होत असतो. हीच परिवर्तनशीलता जीवनगती असते. ही एक स्वाभाविक प्रक्रिया असते. हे लक्षात घेऊन आपण आपल्या विचारसरणीत काही बदल करणार आहोत की नाही ? की अजूनही दैवीशक्ती, चमत्कार, गूढविद्या, मंत्रतंत्र, कर्मकांड, शकून-अपशकून, नवस-सायास इत्यादी जुन्यापुराण्या टाकावू कल्पनांनाच 'कुरवाळत बसणार' आहोत ?

आपल्या संतांनी सुद्धा ह्या अंधश्रद्धा, चमत्कार आणि रूढींवर घणाघाती हल्ला चढवला आहे. संत तुकाराम महाराज त्यांच्या अंभगात म्हणतात -

दाऊ नेणे जडीबुटी । चमत्कार उठाउठी ॥
नाही शिष्यशाखा । सांगो अथाचित लोका ॥
नव्हे मठपती । नाही चाहूरांची वृत्ती ॥
नाही देवार्चन । असे मांडिले दुकान ॥
नाही वेताळ प्रसन्न । काही सांगो खाणखुण ॥
रंडीचंडी शक्ति । मद्य मासाते भक्षिती ॥
बहिरव खंडेराय । ऐचि सुचिसाठी देवू ॥
मुंज्या मैसासुरे । हे तो कोण लेखी पोरे ॥
वेताळे फेताळे । जळो त्यांचे तोंड काळे ॥
डोई वाढवूनी केश । भूते आणिती अंगास ॥
तरी ते नव्हती संतजन । तेथे नाही आत्मखुण ॥
मेळवूनी नरनारी । शकून सांगती नानापरी ॥
तुका म्हणे गैर । नाही त्यापासी गोविंद ॥
ऐसे कैसे झाले भोंदू । कर्म करोनी म्हणती साधू ॥
अंगी लावूनिया राख । डोळे झाकूनी करीती पाप ॥
दावूनी वैराग्याच्या कळा । भोगी विषयाचा सोहळा ॥
नवसासायासे पोरे होती । तयाकारणे का लागे पती ॥
तुका म्हणे सांगो किती । जळो तयाची संगती ॥

त्यांच्या पूर्वीच्या काळातही संत नामदेवांनीसुद्धा समाजातील अस्पृश्यतेवर हल्ला चढवलेला दिसतो. अशा या संत परंपरेतील आधुनिक महान संत गाडगे महाराजांनी तर त्यांच्या वऱ्हाडी भाषेत अंधश्रद्धांवर कडाडून हल्ला केला आहे. ते तर असं म्हणत की, देव जर दीनांचा वाली आहे तर दीन दीनच राहिला नसता. माणसं गरिबीत खितपत पडतात ती देवामुळे नव्हे तर देवाधर्मांच्या नावावर



लुबाडणाऱ्या मध्यस्थ दलालांमुळे. तरी ह्या पुरोहितशाहीविरुद्ध झगडा द्या. "अरे बावळ्यांनो, देव हा देवळात नाही, दगडात नाही तर तो चराचरात आहे, माणसामाणसांत आहे, तुमच्या आमच्यात आहे. एकमेकांशी प्रेमाने वागा, सहकार्याने वागा, मदत करा. तीच खरी देवपूजा आहे."

थोडक्यात काय, माणूसकी हाच धर्म आहे. आणि माणूस हाच देव आहे, ही त्यांची शिकवण अत्यंत विज्ञाननिष्ठ होती.

सत्यनारायणाच्या पूजेविषयी गाडगेबाबांचं वक्तव्य आपल्यापैकी अनेकांनी ऐकलं असेल. काही वाचलंही असेल. ते काय म्हणत ह्याविषयी ? जो देव प्रसाद खाल्ला नाही म्हणून नौका बुडवतो व माणसं मारतो आणि प्रसाद खाल्ल्यावर बुडालेली नौका परत वर आणतो तो देव नसून लाचखोर आहे. त्याला कसलं पुजता ? आणि असं जर या पूजेमुळे घडत असेल तर आपण सगळे सत्यनारायण करू आणि ती इंग्लंडातील भारताच्या किनाऱ्यावर बुडालेली नौका वर काढू. (१९४२ साली सोन्यानाण्यांनी भरलेली एक नौका इंग्लंडहून भारताकडे येत असताना मुंबईच्या जवळच समुद्रात बुडालेली होती.) बोला, आहे तयारी ? एवढ्या जाहीररीत्या अंधश्रद्धेची खिल्ली उडवणाऱ्या गाडगेबाबांना विसरून आपण पुन्हा त्याच गर्तेत पडून राहणं पसंत करत आहोत. हे कितपत योग्य आहे ?

स्वातंत्र्यवीर सावरकरांनीही अंधश्रद्धेवर हल्ला चढवताना एके ठिकाणी म्हटले आहे की, जर गाईच्या शरीरात ३३ कोटी देव असतील तर तुम्ही गाईला जेव्हा जोराने काठीने हाणता तेव्हा कितीतरी देव स्वर्गात जात असतील (मरत असतील) याचा कधीतरी विचार केला आहे का ? म्हणूनच ही खुळचट कल्पना डोक्यातून काढून टाका. गाय उत्तम पशू आहे हे लक्षात घ्या. तिच्यापोटी कृतज्ञ रहाणं महत्त्वाचं आहे. तिला दैवी मानणं साफ चुकीचं आहे.

श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांनी 'सुदाम्याचे पोहे' ह्या पुस्तकातून विनोदी अंगाने श्रावणी, पंचगव्य आणि अशा बऱ्याच काही रूढी आणि कर्मकांडे एकेक करून विचारात घेऊन त्यांची खिल्ली उडविली आहे. त्यातील फोलपणा दाखवून त्या कशा त्याज्य आहेत हे सिद्ध केले आहे. भगत, बुवा, मांत्रिक, ब्राह्मणांनी स्वतःच्या स्वार्थासाठी ह्या अंधश्रद्धा आणि कर्मकांडांचं स्तोम माजवून साऱ्या समाजाला अज्ञानी ठेवलं आहे. मान्य आहे की, मानवी जीवन हे अनिश्चित आहे. पण म्हणून काही दैवी चमत्कारांनी त्याला निश्चिती मिळणार नसते. फार तर आपल्या मनाला तात्पुरतं एक फसवं समाधान मिळतं एवढंच. पण ह्या फसव्या समाधानामुळेच आपण नकळत आपलं नुकसान करून घेत असतो. ह्यात आपलं शोषण केलं जात आहे हेच मुळी आपल्या लक्षात येत नसतं. इतर बाबतीत व्यवहारी असणारे आपण या बाबतीत मात्र पूर्णपणे अव्यवहारी वागतो.

श्राद्धाच्या वेळी पितरांना बोलावण्याऐवजी समाजातील दीनदुबळ्यांना

बोलावून मदत करणं योग्य नाही का ? अन्नछत्र चालवून फुकटची पोटं भरण्याऐवजी, पोट भरण्यासाठी त्यांना श्रमाचं मूल्य समजून देणं योग्य नाही का ? भिकाऱ्यांना भीक देण्याऐवजी त्यांना काम देऊन कामाची महत्ती समजावून देणं आवश्यक नाही का ? एखाद्या जत्रेत हजारोंनी बकरी आणि कोंबड्या कापून रक्ताचा आणि पैशांचा चिखल करण्याऐवजी ह्याच पैशानं आणि स्वतःच्या रक्ताच्या सिंचनानं एखाद्या गावात सुसज्ज शाळा बांधणं योग्य नाही का ? सिद्धिविनायकाच्या देवळासमोर तीन तीन तास लाइनीत उभं राहून पाच मिनिटाचा नमस्कार करण्याऐवजी आपले काम चोखपणे करण्यात वेळ घालवून ज्यांची कामं आपल्यामुळं अडून राहिली आहेत त्यांचा नमस्कार घेणं जास्त चांगलं नाही का ?

तर्कसंगत विचार करणं, आणि तसं वागणं ह्यालाच तर वैज्ञानिक दृष्टिकोन म्हणतात. हा दृष्टिकोन आपल्याला संत तुकाराम, गाडगेबाबा, नामदेव, स्वा. सावरकर, म. ज्योतिबा फुले, आगरकर इत्यादी अनेक जुन्या आणि आधुनिक लोकांनी काळाची पावले ओळखून देण्याचा आटोकाट प्रयत्न केला. त्यांच्या पावलांवर पाऊल आपण टाकणार की, अज्ञानात राहून, आळसात जीवनाची इतश्री करणार ?

खरं म्हटलं तर आपल्यापुढील प्रश्नही फार गहन असतात असे नाही. कुणाला मुलगा होत नसतो, कुणाला नोकरी नसते, कुणाचा आजार बराच काळ बरा होत नाही, कुणाच्या मुलीचं लग्नच जमायला त्रास होत असतो, कुणाला पैसा मिळत नसतो, कुणाला गरिबीचा कंटाळा आलेला असतो, कुणाला मुलीच होत असतात, कुणाला नोकरीत वरची जागा हवी असते. या आणि अशा प्रकारचे प्रश्न घेऊन आपण बाबा, बुवा लोकांच्या किंवा दैवी/देव अंगात आलेल्या व्यक्तिकडे जातो. ही माणसं थोडंसं मानसशास्त्र जाणणारी, चतूर आणि मिठ्ठास वाणीनं बोलून आपल्याकडील दैवीशक्ती आणि चमत्काराच्या जोरावर आपल्याला सहज भुलवतात. आपल्यालाही सुखाचा शॉर्टकट हवा असतो. कष्ट करायची जिद्द नसते. त्यामुळं काही न करता जर बुवामुळं मिळत असेल तर बरं म्हणून आपण त्यांच्या आहारी जातो. आपल्या ह्या दुर्गुणाचाच हे बुवालोक फायदा घेतात. तेव्हा आपण स्वतःचं आत्मपरीक्षण करणार आहोत की नाही ?

हे सांसारिक प्रश्न सोडविण्यासाठी बुवाकडे जाण्यापेक्षा सामाजिक परिस्थिती आणि समाजात रूढ असलेले कालबाह्य विचार ह्यांना बदलणं आवश्यक आहे. आधुनिक समाजात व्यवहारातून निर्माण होणाऱ्या गोष्टी उदाहरणार्थ, पैसा, नफा, संपत्ती आणि त्यांचे नीतीनियम हेच सर्वशक्तिमान बनले आहेत. त्याच जगण्याच्या प्रेरणा ठरल्या आहेत. आणि त्यातच जीवनाचे श्रेय शोधले जात आहे. वैज्ञानिक दृष्टिकोनाच्या अभावी ह्या व्यवहारावर आपले नियंत्रण न राहिल्यामुळे आपण परिस्थितीचे गुलाम बनतो आणि दुःखी होतो. त्याबद्दल देवाकडे, दैवी शक्तीकडे तक्रार करणे आणि सुखाची याचना करणे हा



योग्य मार्ग नव्हे तर माणसाला असहाय्य, दुःखी आणि दुर्बल बनवणारी परिस्थिती बदलून माणसाच्या भौतिक व मानसिक गरजा भागवणारी, माणसाला माणूस म्हणून वागवणारी परिस्थिती निर्माण करणे आवश्यक आहे. हे मानवी विश्व माणसाच्या व्यवहारातून, त्या त्या प्रयत्नांतून, श्रमातून घडलेले आहे. माणूस हाच त्या विश्वाचा, समाजाचा निर्माता आहे. म्हणूनच खऱ्याखोट्या अध्यात्मावर अवलंबून न रहाता मानवाला केंद्रबिंदू मानणाऱ्या शास्त्रशुद्ध प्रयत्नांवरच पुढे सरकावे लागेल.

विज्ञानामुळेच माणसाला खरे आत्मज्ञान झाले आहे. त्याचे प्राणीसृष्टी, अचेतन वस्तू आणि निसर्गाशी असलेले नाते त्याला विज्ञानामुळेच कळले आहे. आपण कोठून स्वर्गातून उतरलेले नसून या सृष्टीच्या विकासक्रमातून उत्क्रांत पावलेले आहोत, या सृष्टीच्या व्यवहाराचा परिपाक आहोत, तिचा एक अविभाज्य घटक आहोत. हे 'आत्मज्ञान' माणसाला झाले आहे. विज्ञानातील विविध शाखांचे ज्ञान जसे कळत आहे तसतसे मानवाचे आत्मज्ञानही वाढत आहे, प्रगल्भ होत आहे. या विकासक्रमामध्ये त्याला इतर प्राण्यांपेक्षा प्रगल्भ, जिज्ञासा, सौंदर्यासक्ती व नैतिक संयमाची शक्ती लाभलेली आहे. निसर्गावर जाणीवपूर्वक केलेल्या श्रमांच्या प्रक्रियेतून स्वतःला आवश्यक अशी परिस्थिती या निसर्गात निर्मिणे आणि समाजामध्ये सर्वांचे कल्याण साधू शकतील असे बदल घडवणे माणसाला शक्य झाले आहे हे विज्ञान सांगते. त्यांना आपल्या अनुभवाच्या कसोटीवर घासून ती आपली श्रद्धा बनवणे शक्य आहे. सामाजिक न्याय, माणसामाणसामध्ये प्रेमाचे संबंध, निसर्ग व मानवातील समतोल प्रस्थापित करणारे एकात्मतेचे नाते आणि 'समाज सर्वांच्या सुखासाठी' या खऱ्या मानवी श्रद्धा आहेत. त्यात चिकित्सेला वाव आहे हेच खरे विज्ञाननिष्ठेचे लक्षण आहे. विज्ञाननिष्ठा व मानवतावाद या दोन अलग, स्वतंत्र गोष्टी नाहीत. ते दोन्ही एकाच विज्ञाननिष्ठ वैश्विक दृष्टिकोनामध्ये माणसाच्या मर्यादांचे तसेच सर्जक क्षमतांचे भान आहे; याच्या आधारेच माणूस नवा, खराखुरा मानवी समाज घडवू शकतो ही जाणीव आणि विश्वास आहे. असा समाज घडवण्यासाठी विज्ञाननिष्ठ वैश्विक दृष्टिकोनाचा स्वीकार करून जग बदलण्याच्या प्रयत्नाला लागणे यातच मानवी जीवनाचे श्रेय सामावलेले आहे.

# परिशिष्टे

## (प्रबोधनकार ठाकरे यांच्या 'गाडगेबाबा' या पुस्तकातून)

# दैववादाचा फैलावा

देवधर्मांच्या या टाळकुटी पिसाटांच्या जोडीनेच दुसरे एक महापाप लोकांच्या बोकांडी बसलेले आहे. ते म्हणजे दैववादाचे. जो पहावा तो दैव दैव करीत कपाळाला हात लावीत असतो. सर्व होणे जाणे तुझ्या हाती ही देवापुढची कबुली. माणूस म्हणजे कोणी नाही. हवेत उडालेला क्षुद्र पाचोळा. त्याच्या नशिबाची कवडी देवकृपेच्या वाऱ्यावर उडणारी. त्याला स्वतःला काही कर्तृत्व नाही. दैवाच्या अनुकूलतेशिवाय त्याच्या हातून काही घडणारे नाही. दैवाचे प्रतिकूल वारे अथवा वादळ टाळण्यासाठी देवाच्या आराधनेशिवायं दुसरा मार्गच नाही. देवभक्तीचे आचरण करूनही स्वतःचे नि संसाराचे वाटोळे झाले, तरी दैवरेषेपुढे कुणाचे काय चालणार ? या समजुतीचे समाधान मानायलाही त्याची तयारी. शहरी शहाणा घ्या अथवा खेडूत अडाणी घ्या – सारे देव-दैववादाच्या जंजाळात गुरफटलेले ! माणूसकीचीही चाड कोणाला राहिलेली नाही. मग भूतदयेची शुद्ध कुणाला ? **"ज्या देशात भविष्यवादी ज्योतिष्यांचा धंदा भरपूर चालतो, तो देश हव्या त्या आक्रमकांनी मन मानेल तेव्हा पायदळी तुडवून गुलाम करावा."** हा एका पाश्चात्य तत्त्वज्ञांचा इषारा भारताच्या इतिहासाला अगदी फिट लागू पडतो.

दैव-दैव धर्मवादाच्या भ्रमाने आमची मनेच साफ मारून टाकली आहेत. कोणी कितीही शिकलेला असो, भविष्य पाहिल्याशिवाय त्याला चैनच पडत नाही. या एकाच नाजूक भावनेचा पुरेपूर फायदा धंदेबाज ज्योतिषी आणि अलिकडचे वृत्तपत्रकार घेतात आणि पोटे भरतात. म्हणजे दैववादाने आमच्या लाज–शरमेचेही वाटोळे केले; असे म्हणायला हरकत नाही. खेडेगावात ग्रामजोशाचा थाट, दर्जा नि अधिकार सांगायलाच नको. पाळण्यापासून सरणापर्यंत, फार काय सरणावर जळून खाक झाल्यानंतरही, त्याच्या पंचांगातील मुहूर्तावर, ग्रहमानावर आणि सल्ल्यावर खेडुतांचे (आणि शहरवासीयांचेही) जीवन चाललेले. त्याने साडेसाती वर्तवली की, मारुतीच्या तेलशेंदरासाठी आणि शनिवारच्या एकादशणीसाठी, लागलीच जोशीबुवांची कातरणी खेडुताच्या फाटक्या खिशाला.

दैववादाच्या पाठपुराव्यासाठी निपजलेल्या दैववादाने 'हिंदू' लोकांची अतोनात अवनती केलेली आहे. धर्माची देवळे आणि देवळांचा धर्म हे एक हिंदू धर्माचे आणि समाजस्वास्थ्याचे महाभयंकर पाप होऊन बसलेले आहे.

## (धनंजय कीर, स. गं. मालशे संपादित 'महात्मा फुले समग्र वाङ्मय' या पुस्तकातून)

# आकाशातील ग्रह

**बळवंतराव हरी साकवळकर. प्रश्न :** आकाशातील ग्रह या आपल्या भूमंडळावरील मानव स्त्रीपुरुषांस पीडा देतात, म्हणून ग्रहशास्त्रवेत्ते मोठ्या डौलाने म्हणतात, हे खरे आहे काय ?

**जोतिराव गोविंदराव फुले. उ. -** या सर्व विस्तीर्ण पोकळीत अनंत तारे आहेत, त्यांपैकी आपल्या अति संनिधचे सूर्य आणि चंद्र हे उभयता या पृथ्वीवरील एकंदर सर्व जलचर भूचर आणि वनचरांसह वनस्पतींचें प्राण जीवन आहेत, म्हणून निर्विवाद आहे. व तसेंच बाकी शनी वगैरे ग्रह एकट्या मानव स्त्रीपुरुषांस पीडा देतात म्हणून सिद्ध करिता येत नाही. तसेंच शनी वगैरे ग्रहांच्या क्रमणाच्या संबंधाने एखाद्या वेळी या आपल्या पृथ्वीवरील एकंदर सर्व प्राणीमात्रांस काही एक तऱ्हेचे हित अथवा अनहित होण्याचा जरी संभव आहे; तरी ते एकंदर सर्व प्राण्यांपैकीं फक्त मानव स्त्रीस अथवा पुरुषास पीडा देतात, म्हणून सिद्ध करतां येणार नाहीं. कारण, शनीवरील एकंदर सर्व प्रदेश इतका विस्तीर्ण आहे कीं, त्याच्या निर्वाहाकरितां चार चंद्र आहेत व त्यास आपल्या सर्वांच्या निर्मिकानें नेमून दिलेले उद्योग एके बाजूला ठेऊन तो या भूमंडळावरील एखाद्या मानव व्यक्तीस पीडा देण्यास येतो; आणि ती पीडा टाळण्याकरितां अज्ञानी लोकांनी धूर्त आर्यभट जोशांस भक्कम दक्षिणा दिल्याने दूर होते, ही सर्व पोटबाबू आर्य जोशांची लबाडी आहे.

**बळवंतराव. प्र. -** त्याचप्रमाणें आकाशांतील मेष व वृषभ ग्रह या भूमंडळावरील चतुष्पाद बैल व मेंढ्यांबरोबर टकरा घेण्याचें एकीकडेच ठेवून येथील एखाद्या द्विपद मानव स्त्रीपुरुषांच्या राशीला येऊन त्यांस पीडा देण्यास समर्थ होतात हें कसें ?

**जोतिराव. उ. -** अहो ! त्यांच्या या भूमंडळावरील चतुष्पाद भाऊबंदांस म्हणजे बैलांस जन्म देणाऱ्या गायांसह मेंढ्यांस अघोरी आर्यभट ब्राह्मण त्यांस खाण्याच्या निमित्ताने यज्ञांमध्ये त्यांचा बुक्यांनीं वध करून त्यांचें मांस जरी ते गिधाडासरखे खात होते, तरी त्यांच्यानें त्यावेळीं आर्यभट ब्राह्मणांचे कांहीं नुकसान करवलें नाही; तथापि हल्लीच्या सत्ययुगांत जर गाया मेंढ्यांस ईश्वरकृपेनें वाचा फुटली असती, तर त्यांनी धूर्त आर्यांतील ग्रंथकारांचीं नाकें ठेचण्यास कधींहि मागेंपुढें घेतलें नसतें.

बळवंतराव प्र. - तथापि आर्यांतील ग्रहशास्त्रवेत्ते आकाशांतील ताऱ्यांच्या संबंधानें मानव स्त्रीपुरुषांच्या जन्मवेळेवरून त्यांच्या नांवांची मूळाक्षरें काढितात आणि त्या मूळाक्षरांवरून त्यांच्या जन्मपत्रिका वर्तवितात आणि त्यांमध्यें त्यांस पुढें होणारे लाभाविषयी व त्यांस पुढें येणाऱ्या संकटांविषयी भाकीत लिहून ठेवतात, याविषयीं येथें थोडासा उलगडा करून प्रतिपादन कराल, तर बरे होईल.

जोतिराव. उ. - आकाशामध्यें सत्तावीस नक्षत्रें आहेत, त्यांपैकीं येथें मानव स्त्रीपुरुषांच्या मूळच्या नांवाचा सिद्धांत सिद्ध करण्याकरितां या प्रसंगीं सत्तावीस नक्षत्रें आणि बारा राशींचीं नांवें कामापुरतीं घेतो. ती अशी. नक्षत्रें - अश्विनी, भरणी, कृतिका, रोहिणी वगैरे; आणि राशी - मेष, वृषभ वगैरे; आतां प्रत्येक दिवशी एक नक्षत्र असतें. त्याचे वेळचे चार भाग करून त्या प्रत्येकांस पहिलें, दुसरें वगैरें चरणें म्हणतात. प्रथम स्त्री अथवा पुरुष यांचा जन्म अश्विनी नक्षत्राच्या पहिल्या चरणांत झाला, तर त्याचें चु होतें. दुसऱ्या चरणांत झाला, तर त्यांचें नाव चे होते. तिसऱ्या चरणांत झाला, तर त्यांचें नाव चो होतें आणि चवथ्या चरणांत झाला, तर त्यांचें नांव ला होतें. भरणी नक्षत्राच्या पहिल्या चरणांत झाला, तर त्यांचे नांव ली होतें, दुसऱ्या चरणांत झाला, तर त्यांचे नांव लू होतें, तिसऱ्या चरणांत झाला, तर त्यांचे नांव ले होते आणि चवथ्या चरणांत झाला, तर त्यांचे नांव लो होतें. कृतिका नक्षत्राच्या पहिल्या चरणांत झाला, तर त्यांचे नांव आ होतें. दुसऱ्या चरणांत झाला, तर त्यांचे नाव इ होते इत्यादि. यावरून मानव स्त्री-पुरुषांचा जन्म होतांना त्या वेळीं नक्षत्राचें कोणते चरण होते, म्हणून समजणारे लोक फारच विरळा. त्यातून नक्षत्रांचे पहिले व दुसरे चरणांचा संधी होतांना एकं शतांश निमिषाची घालमेल झाल्याबरोबर चे-याची चू अथवा चू-याची चे होण्याचा संभव आहे. त्याचप्रमाणे अश्विनीची चार चरणें, भरणीची चार चरणें आणि कृतिकावें पहिले चरण, असे एकंदर सर्व नऊ चरणे मिळून एक मेष रास होते. आतां मेष व वृषभ राशीचा संधी होतांना एक शतांश निमिषाची त्यांच्यामध्यें घालमेल झाल्याबरोबर, वृषभ राशीची मेष रास अथवा मेष राशीची वृषभ रास होण्याचा संभव आहे. त्या सर्वांवरून मानव स्त्री-पुरुषांचा जन्म होतेवेळीं घंगाळाच्या पाण्यांत वाटी टाकून घटका पाहाणारे फारच थोडे; परंतु वांव अथवा कासऱ्याने सूर्य अथवा एखादा रात्रीचा तारा मोजणारे बहुत सांपडतील. यावरून आर्यांतील ग्रहशास्त्रवेत्ते मुली-मुलांच्या जन्मपत्रिका कोणत्या तऱ्हेने वर्तवितात, याविषयीं आपणांस खासा अनुभव असेलच. याशिवाय आपण पेशवे सवाई माधवराव यांची जन्मपत्रिका वाचून पहा, म्हणजे आर्यजोशांची ठकबाजी तुमच्या सहज लक्षांत येईल.

बळवंतराव. प्र. - बरं सुचलें. कांहो! मानव स्त्री-पुरुष बालकांनी आपल्या मातेच्या उदरीं जन्म पावलेल्या वेळेविषयी आर्य गृहशास्त्रवेत्यांनीं ठरविलेल्या मताप्रमाणें आपण प्रतिपादन केलें, हे आपण ठीक केलें. परंतु एकंदर सर्व मानव स्त्री-पुरुष आपल्या मातेच्या उदरांत असतां त्यांच्या सातव्या महिन्यांत का



आठव्यांत कां नवव्या महिन्यांत, ते साक्षात सजीव प्राणी होऊन त्यांचे जन्म पावण्याची ती मुख्य वेळ म्हणावी, अथवा मातेच्या उदराबाहेर पडल्यावर त्यांचे जन्म पावण्याची मुख्य वेळ म्हणावी, या दोहोंपैकींकोणती मुख्य वेळ खरी आहे? याविषयीं नीट उलगडा करून सांगाल, तर बरें होईल.

जोतिराव. उ. - याविषयी आर्यांतील ग्रहशास्त्रवेत्त्यांनीं या कामी केवळ आपली पोटें जाळण्याकरितां ज्योतिषशास्त्रांत हे मनःकल्पित थोतांड उभें केलें आहे. कारण मानव स्त्रियांच्या उदरांत अथवा उदराबाहेर आलेल्या बाळकांची मुख्य जन्म काळांच्या दोन्ही वेळा नव्हेत. परंतु स्त्री-पुरुष जेव्हां एकांत स्थळीं रमतात, तेव्हां स्त्रीच्या उदरांत मानव पुरुष आपल्या स्वतः स्वयंभू अवताराचे बीजारोपण करितो. याविषयीं आर्यांतील गृहशास्त्रवेत्त्यांनीं स्त्री-पुरुषांपासून त्यांच्या रमण्याच्या वेळकाळांची नीकी बरोबर माहिती काढून जर त्यांनी जन्मपत्रिका करण्याची वहिवाट घातली असती, तर त्यां सर्वांस जमतीकरिता या प्रसंगी बरे म्हटलें असते.

(आगरकर वाङ्मय 'सुधारक'मधील निबंधसंग्रहातून)

# आमचें अजून ग्रहण सुटलें नाही.

ग्रहणासारखी पर्वणी आली म्हणजे आमच्या समाजांत जी चलबिचल होऊन जाते, विशेषतः वरिष्ठ वर्गांतील अशिक्षित पुरुषांची व स्त्रियांची जी धांदल उडून गेलेली असते, ती पाहून आमच्या बुद्धीचें ग्रहण अद्यापि सुटलें नाही, असें कोणत्याही विचारी पुरुषास वाटणार आहे. अशा प्रसंगीं अगदीं अज्ञ लोकांचें वर्तन जसें व्हावें तसें आमचें वर्तन होत असतें. ज्या रानटी लोकांस सूर्य एका दिशेनें येऊन दुसऱ्या दिशेनें निघून जातो कसा; चंद्राच्या बिंबास क्षय व वृद्धि कशानें होतें; एकाएकीं सूर्याच्या व चंद्राच्या भोवतीं खळी पडतात कशी; उदककणवाही अभ्रांनी आकाश व्यापून झालें असतां, किंवा ईषत् वर्षाव होऊं लागला असतां, आकाशांतील ज्या प्रदेशांत सूर्य असेल त्याच्या उलट प्रदेशांत नानातऱ्हेच्या रंगांची विशाल धनुराकृति कशी पडते; शुक्रासारखे कांहीं ग्रह कांहीं महिनें क्षितिजापासून वर येत असल्यासारखे दिसत असून पुनः खालीं कसे उतरूं लागतात, व कांहीं दिवसांनी मुळीच दिसेनासे कां होतात; आकाशस्थ कांही तारे परस्परांमधील अंतर कधींच बदलीत नाहींत, व आज या तारकासमूहापाशीं, उद्या त्या तारकासमूहापाशीं अशी एकसारखी स्थानांतरे करीत असतात, याचे कारण काय; सूर्यप्रकाशांत उभे राहिले असतां पडणारी छाया साऱ्या वर्षभर सारखी कां पडत नाहीं; तेजोमय शिखा किंवा पुच्छ असलेले असाधारण प्रचंड तारे एकाएकीं कोठून येतात, व थोडे दिवस दिसत राहून मग नाहींसे कसे होतात, आणि इतर ताऱ्यांप्रमाणें फिरून लौकर कां दिसत नाहींत; एखाद्याच्या गळ्यांतील मौक्तिकहार तुटून पडावा, त्याप्रमाणें नभोमंडलांतील तारकहार त्रुटित होऊन, त्यांतील भव्य मणी अनेक दिशांस विदारल्यासारखे कशामुळें दिसतात; भलत्याच ठिकाणीं एखादे वेळीं उपलवृष्टि कशी होते, मोठमोठीं वादळे कशी सुटतात; डोक्यावरील अफाट पोकळींत पाणी जमतें कसें, आणि पर्जन्यधारा येतात कोठून; चंद्र व सूर्य नित्याप्रमाणें शांतपणें आकाशपंथ आक्रमीत असतां, एकाएकीं त्यांच्या तेजाचा अपहार करून मनुष्यलोकांस कधी गाढ तिमिरांत, व कधीं अर्धवट संध्येत, चाचपण्यास कोण लावतो. वगैरे प्रश्नांचीं समाधानकारक उत्तरें देतां येणें अशक्य असल्यामुळें, त्यांनी आश्चर्यजनक दृग्विषयाविषयी हवें तसे तर्क लढवून, त्यांसंबंधानें आपल्या शोधक मनाची हवी तशी समजूत घालून घ्यावी, आणि त्या समजुतीच्या अनुरोधानें आचरण करावें, हें त्यांच्यासंबंधानें अगदीं स्वाभाविक आहे, व त्याबद्दल त्यांस अणुमात्र दोष लावतां येणार नाहीं; कारण तसें केल्याखेरीज त्यांस गत्यंतरच नाहीं. पण ज्या लोकांस या विषयांचें खरें ज्ञान झालें आहे, त्यांनींही त्यांच्याप्रमाणेंच वर्तन करणें म्हणजे अमूढ असून मूढाप्रमाणें आचरण करणें होत नाहीं काय? कोणी असें म्हणतील कीं, ज्योतिःषास्त्राचें ज्ञान अद्यापि जितकें पसरावें तितकें पसरलें नाही, त्यामुळें सध्याच्या वेडेपणाचा प्रकार दृष्टीस पडतो. या आक्षेपावर आमचें असें उत्तर आहे कीं, कोणत्याही विषयाच्या संबंधानें कितीही ज्ञान वाढलें, व लोकांत त्याचा कितीही प्रसार झाला, तरी जुन्या पद्धती सोडून देऊन तदनुसार नव्या पद्धतीनें वागण्याचें धैर्य आल्याशिवाय, ज्ञानाच्या वृद्धीपासून किंवा त्याच्या प्रसारापासून म्हणण्यासारखा फायदा होत नाहीं. ग्रहणें कशीं होतात, चंद्रसूर्यास खळीं कशीं पडतात वगैरे गोष्टी युरोपांतील सर्व लोकांस समजल्या आहेत, असें म्हणतां येणार नाहीं. पण जेवढ्यांस त्या पक्क्या कळून आल्या त्यांनी पूर्वापार चालत आलेल्या रूढींस न जुमानतां, अगोदर आपलें वर्तन बदलून नंतर दुसऱ्यांचें वर्तन बदलण्याचा प्रयत्न केला, यामुळें तिकडील लोकांच्या बुद्धीस ज्या राहूनें ग्रासलें होतें त्याच्या जबड्यातून त्यांचा लौकर मोक्ष झाला. आमच्या इकडील पंडितांची तशी गोष्ट नाहीं. त्यांना लोकापवादाचें भय फार असल्यामुळें, ते आपल्या पांडित्यप्रदर्शनापलीकडे सहसा जात नाहींत. हा आमच्या राष्ट्रीय प्रकृतींत नैसर्गिक दोष आहे, व यामुळें आमचें अतिशय नुकसान होत आहे. कोणत्याही विषयाच्या संबंधानें जोपर्यंत आपली पक्की खात्री झाली नाहीं तोपर्यंत सामान्य लोकांच्या समजुतीप्रमाणे आचरण करणें दूष्य होणार नाहीं, कारण विनाकारण रूढ पद्धति सोडण्यात कोणत्याही प्रकारचा फायदा नाही. सर्व जुन्या राष्ट्रांत ज्योतिषशास्त्राविषयी नानातऱ्हेचे ग्रह पसरलेले होते, व त्यांच्या अनुरोधानें त्यांचें वर्तन होत होतें. लढाईला जावयाचें झालें, विवाह करावयाचा झाला, कोणत्याही मोठ्या कामासाठी बाहेर पडावयाचें झालें कीं, प्रथम त्या त्या गोष्टीस ग्रहांची अनुकूलता कशी काय आहे, हें जोश्याकडून पहावयाचें, आणि त्यानें ते अनुकूल आहेत, अशी खात्री दिल्यास मग तिला आरंभ करावयाचा, असा प्रकार आशिया व युरोपखंडांतील सर्व जुन्या लोकांत रूढ होता. मनुष्याचें मन जात्या शोधक असल्यामुळें, ज्या ठिकाणीं त्याची मति खुंटते त्या ठिकाणीं तें पाहिजे तसल्या गोष्टीवर विश्वास ठेवण्यास तयार होतें. पृथ्वीवर घडून येणाऱ्या मोठमोठ्या चमत्कारांची मीमांसा आतांप्रमाणें त्या वेळेस करतां येणे शक्य नसल्यामुळें आकाशांत भ्रमण करणाऱ्या तेजोनिधींकडून ते होत असावे, अशी कल्पना त्या वेळेस होणे फार साहजिक होतें. तसेंच अनेक वर्षें लक्षपूर्वक आकाशाचें अवलोकन केल्यावर तारे आणि ग्रह यांतील भेद लक्षांत यावा; ग्रह मागें पुढें होतात ते आम्हांस सुख किंवा दुःख देण्यासाठी होत असावेत; श्वेत व रमणीय शुक्र सुखप्रद व बलवर्धक असावा; रक्तवर्ण मंगळास रुधिराची प्रीति असावी; मंद व निस्तेज शनीचा स्वभाव दुष्ट असून मनुष्यांना पीडा देण्यांत त्यास मोठा आनंद होत असावा – अशा कल्पना येऊ लागून अखेरीस मनुष्यांच्या मुख्य मुख्य वृत्तींचा आरोप, निरनिराळ्या ग्रहांवर, त्यांच्या त्यांच्या स्वरूपाच्या अनुरोधानें, व कवींच्या आणि जोश्यांच्या तर्कांप्रमाणें, करण्यांत आला यांत कांहीं नवल नाहीं, व सामान्य लोकांनीं तत्कालीन श्रेष्ठ व सुज्ञ लोकांच्या पदपंक्तीचें अनुसरण केलें

यांतही कांही वावगें झालें नाहीं पण अमुक गोष्ट अमुक रीतीने घडत नाहीं, अमुक रीतीनें घडतें, असें ज्यास पक्कें समजून आलें आहें, तो जर लोकांचा गैरसमज दूर करण्याचें धैर्य न करील, तर खऱ्या ज्ञानाचा प्रसार होऊन सुधारणा व सुखवृद्धि कशी व्हावी? आपल्या इकडील तत्त्ववेत्त्यांत आणि शास्त्रज्ञांत एक मोठा दोष दिसून येतो तो हा की, त्यांना आपल्या समजुतीप्रमाणें आचरण करण्याची उत्कट इच्छा किंवा धैर्य होत नाहीं. "पुराणांतली वांगी पुराणात" अशा पद्धतीने आमच्यांतील विद्वान म्हणविणाऱ्यांचें वर्तन बहुधा होत असल्यामुळें दुर्मति, दुराग्रह आणि दुष्ट चाली यांचें ठाणें या देशांत कायम झाल्यासारखें झालें आहें. बाकी ज्या देशांत भास्कराचार्यांसारखे ज्योतिषी होऊन गेले, त्या देशांत अजूनपर्यंत चंद्रग्रहण किंवा सूर्यग्रहण आले असतां कांही वेळ थंड पाण्यांत निष्कारण बुड्या मारण्याची, उपवास करण्याची, भलभलत्या वस्तूंचीं दानें करण्याची, मूर्खपणाच्या मंत्राचा जप व सिद्धि करण्याच्या फंदांत पडण्याची, पापड-लोणच्यावर व दहींदुधावर तुळशीपत्रें घालीत बसण्याची, आणि जणुं काय आपणांस सुतक्यानेंच स्पर्श केला आहे कीं काय असें समजून, स्त्रीपुरुषांनीं धोत्रापात्रांसकट डोक्यावरून पाणी घेण्याची चाल अजूनपर्यंत दृष्टीस पडावी काय? पण आमच्या भास्कराचार्यांसच हा प्रकार अप्रशस्त म्हणण्याची छाती कोठें होती? भास्कराचार्यांचे भास्कराचार्यत्व फक्त वेधशाळेंत ! आचार्य तिच्याबाहेर पडले कीं, "यद्यपि शुद्धं लोकविरुद्धं ना करणीयं नाचरणीयं" या उपदेशाचे अनुयायी ! गॅलीलिओ-कोपरनिकसादि युरोपीय ज्योतिर्विदांनी अशा प्रकारचेंच आचरण केलें असतें तर युरोपांत ज्ञानरवीचा प्रकाश फांकून अज्ञानतिमिराचा विध्वंस झाला असता काय, व आज त्या खंडास जो सुदिन प्राप्त झाला आहे तो होता काय? तसें इकडें व्हावें अशी इच्छा असेल, तर लोकापवादाचें भय टाकून, आपल्या मनास शुद्ध दिसेल तें लोकांस सांगण्याचें, व तदनुसार वागण्याचें, धैर्य केलें पाहिजे; आणि तसें पुष्कळांकडून होऊ लागलें, तरच अज्ञानग्रहाने ग्रासलेल्या या आमच्या हतभाग्य देशाचें ग्रहण लौकर सुटणार आहे !



## (महादेवशास्त्री जोशी यांच्या 'आत्मपुराण' पुस्तकातून)

# आत्मपुराण

पणजीत मध्यवस्तीत मी एक जागा मिळवली आणि तिथे पाटी झळकवली.

"ज्योतिष कार्यालय.

ज्योतिषी पं. महादेवशास्त्री जोशी.

येथे ज्योतिषविषयक सर्व कामे केली जातील."

ती पाटी पाहून हळूहळू गिऱ्हाइकं यायला सुरुवात झाली. पृच्छक येऊ लागले. जे कोणी या नव्या ज्योतिष्याची परीक्षा पाहायला येत, ते माझ्या पुढे मख्खासारखे बसत. आपल्या स्थितीचा माल थांगपत्ता लागू देत नसत. पत्रिका पाहून मीच काय ते बोलावं, अशी त्यांची अपेक्षा असायची. कोण खरा पृच्छक अन् कोण परीक्षक हे समजायला जड जायचं. कोणी आपल्या पत्रिकेचं भेंडोळं माझ्यापुढे उलगडून मला विचारायचं, 'सध्याचं ग्रहमान कसं आहे? भाग्योदय कधी होईल? मुलीचा विवाहयोग कधी? नवरा कसा मिळेल? कोर्टातला दावा मी जिंकेन की माझा प्रतिस्पर्धी जिंकेल? किती काळ लागेल? धनलाभ केव्हा आहे?....'

मी दशा, अंतर्दशा पाहून, गोचरीतल्या ग्रहांचे पत्रिकेतल्या ग्रहांशी योग कसे होतात, ते पाहून उत्तर देत असे. याचाच दुसरा एक भाग म्हणजे प्रश्न-ज्योतिष. गाय हरवली आहे, कधी परत मिळेल? अंगठी चोरीला गेली आहे. चोर आतला का बाहेरचा? बाहेरचा असला, तर तो कोणत्या दिशेला आहे? नातेवाइक प्रवासाला गेला आहे, त्याचा अजून पत्ता नाही. तो परत कधी येईल?....'

अशा वेळी पृच्छक प्रश्न करील त्या वेळची कुंडली मांडून उत्तरं द्यावी, असा प्रश्नज्योतिषाचा आदेश. मी तेच करीत असे. मला त्या कुंडलीवरून भावलं ते उत्तर देत असे.

पण थोड्याच दिवसांत मला दिसलं ते हे, की माझी भविष्यवाणी खरी उतरत नाही. मी ग्रहांचा केंद्र-त्रिकोण, धनस्थान, लाभस्थान, नवपंचमयोग, हे सगळं पाहून उत्तर द्यायचा. पण पंचवीस टक्केच जमलं तर जमायचं. उदाहरणार्थ, तुमचा प्रवासी काहीतरी अडचणीत सापडला आहे, तो परत यायला अजून पंधरा दिवस लागतील, हे माझं भविष्य'. पण दुसऱ्याच दिवशी पृच्छकाने 'जितं मया' अशा अभिनिवेशाने येऊन सांगावं की, आमचा प्रवासी काल रात्रीच सुखरूप घरी

आला. म्हणजे मी खोटा पडलो. पटलेलं सांगायला कोणी यायचा नाही. चुकलेलं सांगायला मात्र हटकून यायचा. ग्रंथ पाहायचा अन् सांगायचं म्हटलं तरी ठोकताळा जमत नसे.

एक उदाहरण सांगतो. ज्याच्या लग्नी रवी असेल, तो माणूस उंच असतो, हे शास्त्र. पण समोरचा माणूस मध्यम बांध्याचाच दिसायचा. ग्रंथाधारेच त्याला विचारावं, 'तुला वात विकाराचा त्रास होतो का?' तर त्याने म्हणावं, 'माझी कफप्रकृती आहे.' ' तुझा धंदा फिरतीचा आहे का?' हे ग्रंथोक्तच भविष्य सांगायला जावं, तर तो म्हणे, 'माझं पेठेत दुकान आहे.'

मला कळेना, असं शास्त्रच माझ्याविरुद्ध का जातं? त्याचा परिणाम असा झाला, की पृच्छक पुढे आला की, मला आनंद होण्याऐवजी संकटच वाटू लागलं. बिचारा तो माणूस माझ्या पंचांगावर रुपया – आठ आणे ठेवून जाणार होता. पण मला ती दक्षिणा नकोशीच व्हायची. माझा आत्मविश्वास ढळला. ग्रंथ मला फसवतात, का ते मला नीटसे समजलेच नाहीत, याचा निर्णयच मला करता येईना. काही दिवस असे गेले. मला तो व्यवसाय सोडायचा नव्हता. पण त्याची पायाभरणीच होत नव्हती.

गोव्यात एक ज्योतिषी मान्यता पावलेले होते. त्यांच्याकडे माणसांची रीघ असायची. कपाळी दोन भुवयांमध्ये अन् कानांच्या पाळ्यांना शेंदूर लावून ते आसनस्थ व्हायचे. संध्याकाळपर्यंत त्यांच्या पुढे पंचवीस-तीस रुपयांची नाणी गोळा व्हायची. या ज्योतिषभास्कराकडे जाऊन मी त्यांना 'शिष्यस्तेऽहम्' म्हटलं. ते म्हणाले, 'राहा आमच्याकडे दोन दिवस. तुला मार्ग दिसेल.'

पृच्छकांशी ते बोलत, ते बोलणं मी लक्ष देऊन ऐकू लागलो. पण त्यात मला शास्त्र कुठेच दिसलं नाही. ते नेमकं उत्तर कधीच सांगत नसत. ते पृच्छकालाच बोलायला लावीत. त्यातून त्याचा इतिहास वदवून घेत. त्याच्या एकूण आर्थिक परिस्थितीचा अंदाज घेत. मुख्यत्वे पृच्छकाची आर्थिक, बौद्धिक कुवत ओळखीत. अन् मग हे सगळे मीच तुला सांगितलं, असं त्याला भासवीत. वायदे देत, पण ते 'षण्मासिंचे.' 'आशां कालवतीं कुर्यात्' हे पहिलं सूत्र. 'कालं विघ्नेन योजयेत्' हे दुसरं सूत्र. 'तुझं काम नक्की होणार, पण मधे काही अडचणी आहेत. आहेत ना?' 'आहेत.' 'मग त्यांचं निवारण झालं पाहिजे. ग्रहच ते निवारण करणार आहेत. तुम्ही फक्त वाट पाहायची !'

त्यांच्या पाल्हाळिक पण संदिग्ध बोलण्यातलं एखादं विधान जरी पृच्छकाला पटलं, तरी तो 'खरं आहे' म्हणायचा. 'जा आता घरी. सारं ठीक होणार आहे. वाट पहा !' पृच्छक आपली आशा पल्लवित करून घरी जायचा.

मी हे सगळं दोन दिवस राहून पोटभर ऐकलं. पण समाधान झालं नाही.



मग मी दुसऱ्या एका भास्कराचार्यांकडे गेलो. त्याने तर आपल्या बैठकीच्या दालनात भलं मोठं देवस्थानच मांडून ठेवलं होतं. उदबत्त्या, फुलं, कुंकवाची उधळण, पुढे विडादक्षिणा, असा तो थाट होता.... एवढं सगळं करून तो ज्योतिषी दुबोटी आडवं गंध लावून आपल्या देवस्थानापुढे आसन मांडून बसे. शेजारी दोन-चार ग्रंथ उघडून टाकलेले. ते सगळं पाहून येणारा पृच्छक आधीच, संमोहित होत असे. त्यांचंही भविष्य व्यवहारज्ञानावरच आधारलेलं. श्लोकांची पुटपुट पृच्छकाच्या डोळ्यात धूळ फेकण्यासाठी. चाणाक्षपणा अन् वाक्चातुर्य, हे त्याचं शास्त्र. आधी भविष्य सांगायचं. मग त्याच्या सिद्धीसाठी उपासना सांगायच्या. 'शंकरावर लघुरुद्र कर', 'नवचंडी कर', 'संकष्ट्या धर', 'अशुभ ग्रहाचा मंत्र जप', 'शनिवारी एकभुक्त अन् मारुतीला तेल' हे आणि असंच तोंडाला येईल ते. मग गिऱ्हाईक म्हणायचं,

'माझा लघुरुद्र तुम्हीच करून घ्या. माझी नवचंडी तुम्हीच पुरी करून द्या', 'मला जप कळत नाही तो तुम्हीच माझ्यासाठी करा....'

"मला कुठे आहे एवढी सवड? पण तुझ्याकरता म्हणून सुपारी घेतो. इतकी इतकी रक्कम माझ्याकडे आणून दे."

म्हणजे ज्योतिषातून भिक्षुकी अन् भिक्षुकीतून पुन्हा ज्योतिष.

तुमचं भविष्य खरं ठरलं नाही अस सांगायला कोणी आला, तर हे ज्योतिषी त्यालाच जामायचे.

"संकष्टीच्या दिवशी चंद्रोदयाच्या आधी जेवला असशील." "एखादा तरी शनिवार मोडला असशील. खरं ना? आठवून सांगा."

"होय महाराजा ! एकदा घडलं तसं."

"अरे, मग भविष्य जमायचं कसं? उपासना कडक पाहिजे. शनी ग्रह आहे तो. महाखट. शिवाय त्याच्यावर मंगळाची दृष्टी. जा, सगळं नीट कर अन् मग मला सांगायला ये."

तो पृच्छक बिचारा पुन्हा दक्षिणा ठेवून तोंडात मारल्यागत निघून जायचा.

हे सगळं ऐकून मी त्या भास्कराचार्याला माझी भाबडी शंका विचारली,

"यात जातकशास्त्र आलंच कुठे?"

"जातकशास्त्र? तुम्ही ग्रंथाधारे सांगायला गेलात, की मेलात. इथे शब्दजंजाळच कामी येतं. समोरच्या माणसाचं सूक्ष्म निरीक्षण करायचं, भविष्य सांगायचं ते बरंच सांगायचं अन् त्याला आशेच्या घोड्यावर बसवून पाठवून द्यायचं. अहो, हा धंदा आहे. यात तुमचं वाक्चातुर्य जितकं प्रभावी, तितकं तुमचं भविष्य बरोबर..."

मी हिरमुसला होऊन तिथून निघालो. मूलभूत विचार करू लागलो. नेमकं भविष्य सांगायला वाग्जाल का म्हणून पसरावं लागावं? खरं होतं त्या ज्योतिष्याचं म्हणणं. ग्रंथाधारे भविष्य वर्तवणं म्हणजे स्वतःच्या पायावर धोंडा पाडून घेणं. जातकशास्त्राचे ग्रंथ कित्येक शतकांपूर्वीचे म्हणजे मध्ययुगातले. त्या वेळचा कृषिप्रधान समाज लक्षात घेऊन त्या अनुषंगाने बेतलेले. आजचं युग पार बदललं आहे. आज माणसापुढे कितीतरी नवनवी व्यवसायक्षेत्रं उभी आहेत. त्यात नित्य नवी भर पडत आहे. राजकारण बदललं आहे. समाजकारणात उलथापालथी घडत आहेत. प्रत्यही नवे नवे शोध लागत आहेत. 'एष चंद्रो जलमयः' हे आम्ही पूर्वी घोकलेलं ग्रहशास्त्र. पण चंद्रावर पाय ठेवून आलेले अंतरिक्ष प्रवासी सांगतात, की चंद्रावर पाण्याचा टिपूसही नाही. आहेत ती मोठमोठी प्रचंड विवरं. समाज खूप पुढे गेला; पण जातकशास्त्र मध्ययुगातच रेंगाळत राहिलं. बदलत्या जगाशी ते आपला मेळ घालू शकलं नाही. किंबहुना जातक हे अजून शास्त्रपदवीला पोचलंच नाही. मग उरले ते आडाखे. वर्तवायचा तो अंदाज करायचा. तो शब्दच्छल! क्वचित एकदा नेमकं भविष्य सांगणाराही भेटतो, पण ते त्याचं जातकशास्त्र नसून अंतःस्फुरण असतं. हे तो कबूलही करतो. पण मला कधी तसलं अंतःस्फुरणही झालं नाही. म्हणजे तिकडूनही मी कच्चाच !

छेः! हे भविष्यकथन आपल्याला बापजन्मी जमायचं नाही. मी किती दिवस लोकांना अन् स्वतःलाही फसवीत राहू? मला कंटाळा आला त्या गोष्टीचा. शेवटी मला जाणवलं ते हे, की ज्योतिष हा माझा जीवनव्यवसाय होऊ शकणार नाही. ज्योतिषातून निवारक दानधर्मकृत्यं काढून ती ग्राहकांच्या माथी मारायची हे तर मला मुळीच जमणार नाही. उणंपुरं वर्षभर मी हा मानसिक ताण सोसला. अन् मग एके दिवशी निर्धार करून मी ज्योतिषकार्यालयाची पाटी स्वहस्ते खाली काढली. 'जे हाती आवाहन, ते हाती विसर्जन !' पणजीचं बिऱ्हाड मोडून मी परत विमनस्क अवस्थेत आंबेड्याला आलो.

त्या दिवसापासून तो आजतागायत मी कोणताही ज्योतिषग्रंथ उघडला नाही. कोणाचंही भविष्य सांगितलं नाही. सांप्रत मी माझी स्वतःची पत्रिकाही विसरून गेलो आहे. मी ज्योतिषशास्त्रावर कायमचा 'ड्रॉप'चा पडदा टाकला आहे. ज्योतिष सोडलं, पण 'ततः किम्' हा प्रश्न मला कुरतडीतच राहिला. "ततः किम्? ततः किम्?"